# THE TEMPEST.

A PLAY

BY

WILLIAM SHAKESPEARE.

TRANSLATED INTO MARATHI

BY

NILKANT JANARDAN KIRTANE,

AUTHOR OF

"A REVIEW OF GRANT DUFF'S HISTORY OF THE MARATHAS."

*Registered under Act XX. of 1847.*

Bombay:

PRINTED AT THE

EDUCATION SOCIETY'S PRESS, BYCULLA.

1875.



*Price One Rupee.*

शेक्स्पीयरकृत

# टेंम्पेस्ट नाटक

याचें मराठी भाषांतर

नीलकंठ जनार्दन कीर्तने,

ग्रांट डफकृत मराठ्यांच्या इतिहासावर टीका

या निबंधाचे कर्त्ते यांनीं केलें

तें

सन १८४७ च्या २० व्या आक्टाप्रमाणें नोंदिलें आहे.

---

मुंबई.

एड्युकेशन सोसायटीच्या छापखान्यांत छापिलें.

---

सन १८७५.



कि. रु. १ [illegible] आणे.

TO

# SIR H. D. DALY, K.C.B.,

AGENT GOVERNOR GENERAL FOR CENTRAL INDIA,

IN

TOKEN OF

DEEP RESPECT FOR HIS

GREAT ZEAL AND ENDEAVOURS

IN THE EDUCATION AND WELFARE OF

THE PRINCES UNDER HIS CHARGE,

THIS TRANSLATION IS MOST

HUMBLY DEDICATED, WITH

HIS PERMISSION,

BY

The Translator.

हें भाषांतर,

मेहेरबान सर एच. डी. डेली, के. सी. बी.

एजंट गव्हर्नर जनरल मध्य हिंदुस्थान

यांस,

त्यांचे ताब्यांतील राजकुमारांच्या विद्येविषयीं व

सुधारणुकेविषयीं त्यांची कळकळ पाहून, त्यांची आज्ञा घेऊन,

भाषांतरकर्त्यानें

परम आदरानें नजर केलें असे.

# प्रस्तावना.

कांहीं दिवसांपूर्वी रावसाहिब महादेव गोविंद शास्त्री कोल्हट-कर यांनीं शेक्स्पीयरकृत अथेल्लो नामक नाटकाचें मराठींत उत्कृष्ट भाषांतर केलें तें पुष्कळांनीं वाचलेंच असेल. व त्यावरून शेक्स्पीयर साहेबाची योग्यता पुष्कळांस कळलीच असेल. त्याच प्रसिद्ध नाटककाराचें हें टेंपेस्ट ह्मणजे वादळनामक नाटक आहे. याचें भाषांतर, कांहीं दिवसांपूर्वी श्रीमंत महाराज तुकोजीराव होळकर बहादूर, जी. सी. एस्. आय्. यांचे इंग्रेजी मदरशांत मुख्य गुरूचें काम करीत असतां, परीक्षेस जाणाऱ्या पहिले वर्गास हें नाटक शिकवीत असतां, मीं केलें. तें कित्येक रसिक मित्रांस दाखवितां त्यांचें मत असें पडलें कीं, हें भाषांतर छापिलें असतां विद्यार्थ्यांस उपयोगीं पडेल; व तसेंच इतर लोकांसही मनोरंजनार्थ वाचण्यास उपयोगीं पडेल. तेव्हां मित्रमंडळीचे सांगण्यावरून हें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. शेक्स्पीयर तर महाकवि,—व त्याचा प्रथम परिचय महाराष्ट्रलोकांस कैलासवासी शास्त्रीबुवासारख्यांचे विद्यमानें झाला, तेव्हां आतां पुढें या कामांत घुसणें तें विचार करूनच घुसलें पाहिजे; हें जरी खरें आहे, तरी हरएकानें शक्त्यनुसार सदुद्योग केलाच पाहिजे; ह्मणून भीत भीत हा ग्रंथ मी सज्जनांपुढें सादर करितों. तें हा माझा नवीनच व्यवसाय आहे हें ध्यानीं आणून प्रमादाची क्षमा करतील.

हें भाषांतर सरासरीं अर्थ जमेस धरून केलें नाहीं. परंतु मूळ अर्थ साधेल तितका शब्दशः मराठींत पद्धतवार आणण्याचा

प्रयत्न यांत केला आहे. भाषांतराविषयीं माझें मत असें आहे कीं, मुळांतील शब्द व मर्म न सुटतां कोणत्याही भाषेंतील काव्यनाटकादि ग्रंथांचें भाषांतर कोणत्याही अन्य प्रौढ भाषेंत चांगलें होऊं शकतें. ग्रंथकाराजवळ शब्दांचा व वाक्यरचनांचा भरणा मात्र पाहिजे. या मतास अनुसरून हें भाषांतर केलें आहे. तेव्हां विद्यार्थ्यांस यापासून बराच फायदा होईल अशी उमेद आहे. ती कितपत यथार्थ आहे हें अनुभवांतीं समजणार आहे. मराठी भाषणाच्या पद्धतीचाही त्याग आमचे समजुतीनें आह्मीं केला नाहीं. तथापि इंग्रजी जाणणारांच्या हातून या प्रकारचे प्रमाद नकळत घडत असतात हें सर्वांस माहीत आहेच. व त्याप्रमाणेंच या भाषांतरांतही कांहीं झाले नसतील असें नाहीं.

नाटकाचे प्रस्तावनेंत नाटकांतील कथासूत्र वाचकांस सांगण्याचा प्रघात अलीकडेस पडला आहे. तसें येथें करण्याची गरज नाहीं. कारण या नाटकाचें प्रथम अंकांतच कथासूत्राचें निरूपण प्रसंगवशात् मोठ्या सुरसपणें झालेलें आहे. तें वाचक वाचतीलच. कथासूत्र सांगणें राहिलें, तेव्हां, या मूल ग्रंथावर इंग्रेजींतील प्रसिद्ध विद्वान जान्सन्साहेब यांनीं एके ठिकाणीं आपलें मत प्रकट केलें आहे तें सार्थ व संक्षिप्त आहे, ह्मणून त्याचा उतारा खालीं भाषांतररूपें करितों व तसेंच या ग्रंथकाराचें चरित्र थोडक्यांत सांगतों.

"टेम्पेस्ट नाटकाविषयीं असें ह्मटलें आहे कीं, याचें कथासूत्र "सरळ संगतवार आहे. व "रिव्हाय्जल्" नामक ग्रंथकर्त्याचें "असें ह्मणणें आहे कीं, ही गोष्ट कथानुसार अवचित घडून आली "आहे; ग्रंथकारानें बुद्धिपुरःसर अशी कथासूत्राची रचना घटिली "नाहीं. माझेंही मत असेंच आहे. परंतु हेंच संविधानक कर-"ण्यांत शेक्स्पीयर साहेबाचा उद्देश कोणता असेल तो असो; परंतु

" या कथासूत्राच्या योगें नानाविध पात्रांची योजना अद्भुत कल्पना-
" शक्तीनें त्यानें केली आहे, व त्या पात्रांची बतावणी व बोलणीं,
" ज्यास जशीं असावीं तशीं, मनुष्यस्वभावास ओळखून अतिचातु-
" र्यानें केलीं असून, त्यायोगें ग्रंथकर्त्याचा बहुश्रुतपणा व संसा-
" रातील घडामोडीमुळें मनुष्याचे मानसाचे ठायीं होणाऱ्या विकृ-
" तींचें ज्ञान, उत्कृष्ट प्रकट झालें आहे. या एकाच नाटकामध्यें
" राजेरजवाडे, कारभारी, दरबारी, नाविक, इत्यादि नानाविधपात्रें
" असून त्यांची बतावणी उत्कृष्ट केलेली आहे. वायुरूपी
" पिशाचादि योनींचीं पात्रें यांत आणिलीं आहेत व पृथ्वीवरच
" उत्पन्न झालेल्या एक्या जन्मसमंधाचेंही एक पात्र आणिलें
" आहे. मंत्रतंत्रादि प्रकार, सागरामधील प्रचंड वातादिकांचे
" विडवर प्रसंग, व निर्जन बेटावर राजादिका सारख्यांवर आ-
" लेले दुर्घट प्रसंग, अकैतव मुग्धजनांचें प्रथम अनुरागाचे प्र-
" कार, इत्यादिकांचें यांत उत्कृष्ट वर्णन असून, अखेरीस दुष्टज-
" नांचें शासन करून या नाटकांतील नायक व नायिका, ज्यां-
" चेविषयीं वाचकांचे चित्तीं बलवत्तर प्रेम उत्पन्न होतें, त्यांचा
" विवाह लावून देऊन ग्रंथकारानें शेवट गोड केला आहे."

शेक्स्पीयर साहेबाचा फारसा वृत्तांत उपलब्ध नाहीं. जो उपलब्ध आहे त्यांतील सारस्य खालीं लिहिलें आहे. जान शेक्स्पीयर व त्याची बायको मेरी आरडेन यांचे पोटीं इंग्लंडामध्यें बारिक् नामक प्रांतांत सन १५६४ च्या एप्रिल महिन्यांत वुलीयम् शेक्स्पीयर् प्रस्तुत ग्रंथकार, याचें जन्म झालें. त्या कालच्या यांचे वडिलाचे स्थितींतील लोकांप्रमाणेंच याचे बापास अक्षर ओळख नव्हती; म्हणून गांवकीच्या संबंधाच्या वह्यांमध्यें सहीच्या ठिकाणीं तो ख्रिस्तीधर्मसूचक चिन्ह जो क्रूस तें करीत असे. परंतु प्रस्तुत ग्रंथकारास पाठशाळेंत बराच विद्येचा संसर्ग झाला

[illegible]
कुटुंब आपले गांवींच ठेवलें होतें. नाटकामध्यें प्रथम हा सोंग घेऊं लागला. परंतु पुढें नाटकग्रंथ रचून यानें मोठी प्रतिष्ठा संपादिली, व एक दोन नाटकगृहांचा मालक झाला. यानें इंग्रेजी भाषेमध्यें सुमारें अठ्ठावीस उत्कृष्ट नाटकें रचिलीं आहेत. सर्वानुमतें याच्याशीं समतोल असे नाटककार पृथ्वीवर कोणीही झाले नाहींत असें आहे. कालिदासास हिंदुस्थानांतील शेक्सपीयर असें ह्मणतात. व याप्रमाणें कोणी कोणत्याही देशांत अत्युत्तम नाटककार झाल्यास, त्या देशांतील तो शेक्सपीयर असें ह्मणण्याची चाल इंग्रेजींत पडली आहे. याचे ग्रंथांतील पात्रांची बतावणी जशी हुबेहुब असते तशी दुसऱ्यास साधत नाहीं. व ही बतावणी साधणें हा नाटकांतील मुख्य अंश होय. तसेंच यानें ग्रंथही पुष्कळ व उत्कृष्ट केले, ह्मणून याचे बरोबर दुसरा ग्रंथकार लागूं शकत नाहीं. कोणीं कोणीं एक किंवा दोन ग्रंथ याच्या ग्रंथांशीं समतोल असे केलेले आहेत. पण ते एकदोनच ग्रंथ. याच्या इतके विपुल दुसऱ्या कोणा ग्रंथकाराचे नाहींत. आमचे कविशिरोमणि कालिदास यांचीं नाटकें जगत्प्रसिद्ध आहेत. आणि त्यांत अभिज्ञान शाकुंतल नाटक अतिरम्य आहे. तत्तुल्य नाटकें शेक्सपीयर साहेबाचीं चार पांच आहेत. यावरून याचे महत्वाविषयीं वाचकांस सहज कळून येईल. याचे सर्व ग्रंथ पद्यात्मक आहेत. त्यांचीं भाषांतरें पृथ्वींतील बहुतेक प्रौढदशेस आलेल्या चालू भाषांमध्यें झालेलीं आहेत. तशींच मराठींत होणें इष्ट आहे. व तशीं भाषांतरें एकदमही होणें कठिण. मध्यंतरीं अल्पस्वल्प आमच्यासारखे

प्रयत्न झालेच पाहिजेत. जें इष्ट सांगितलें तसें होण्यास व आमचे महाराष्ट्रदेशबांधवाचें अल्पही मनोरंजन होण्यास हा ग्रंथ उपयोगीं पडल्यास माझे श्रम सफल झाले असें मला वाटेल. वर शेक्सपीयर साहेबाची जी मी स्तुति केली आहे तिची प्रचीति जर प्रस्तुतच्या भाषांतरानें कांहींच न आली तर तो अन्याय भाषांतरकर्त्याचा समजावा. मुळांतच कांहीं सौरस्य नाहीं असें समजूं नये. परकीय लोकांच्या संबंधाचें हें नाटक आहे, म्हणून रसमाधुर्याची प्रचीति उत्पन्न होणें हेंही हरएकाचे ठायीं संभवत नाहीं, हेंही सांगणें रास्त आहे.

नीलकंठ जनार्दन कीर्तने.

मुक्काम छावणी इंदूर,

तारीख २ माहे आगष्ट सन १८७५ ईसवी.

# टेम्पेस्ट नाटक.

---

## नाटकांतील पात्रें.

आलोंझो .................. नेपल्सचा राजा.
फर्दिनान्द ............... त्याचा मुलगा.
सिबाश्चियन ............ राजाचा भाऊ.
प्रोस्पेरो .................. मिलन नामक प्रांताचे गादीचा खरा मालक.
आन्तोनिओ ............ मिलनची गादी बळकावून बसलेला प्रोस्पेरोचा भाऊ.
गोंझालो .................. एक विश्वासू मंत्री.
एड्रियन, फ्रान्सिस्को...... दोघे सरदार.
स्तिफानो .................. झिंगलेला कोणी एक दारूबाज कोठारी.
त्रिंक्युलो ................ कोणी एक राजाचे पदरचा खुषमस्कऱ्या.
तांडेल .................. जहाजावरील मुख्य कामगार.
मोकद्दम .................. नावाडिकांवरील कामगार.
कित्येक खलाशी.
क्यालिबन (मृत्पिंड) ... एक विद्रूप आणि राक्षसी प्रोस्पेरोचा गुलाम.
मिरांडा (नवल सुंदरी) ... प्रोस्पेरोची मुलगी.
एरियल (मरुत्) ......... एक वायुरूपी चपल पिशाच.
जुनो (इंद्राणी) .........
सिरिस (क्षेत्रपालिका)... } हीं सोंगें घेतलेलीं पिशाचें.
इरिस (इंद्रधनुषा) ......
नागकन्या, कृषिक, प्रोस्पेरोचे चाकरींतील आणखीं पिशाचें.
स्थळें— प्रथम व्यवसाय समुद्रांत एक्या जहाजावर होतो; तदनंतर एका निर्जन बेटावर.

## अंक १ प्रवेश १.

स्थळ—समुद्रांत एका जहाजावर वादळ सुटून मेघगर्जना होतात व विजा चमकतात.

[जहाजावरील तांडेल व नावादिकांचा मोकद्दम हे एकेकटे येतात.]

**तांडेल**—मोकद्दम!

**मोकद्दम**—जी महाराज; हजर आहे.

**तांडेल**—अरे भल्या मोकद्दमा, जा आणि खलाशांस हुकुम कर कीं, काम मोठें झपाट्यानें चालूं द्या; नाहींतर जमिनीवर जहाज हपटून त्याचे तुकडे होतील. जा जा, त्यांना घाई कर. [जातो.]

[कित्येक खलाशी येतात.]

**मोकद्दम**—भलेरे गड्यांनो, चालूंद्या झपाटा, चालूंद्या झपाटा! बेऱ्यांनो हात तर चालूंद्या, चालूंद्या हात. डोलावरचें अवजार पाडा खालीं, पाडा खालीं! ते तुह्मांस तांडेल शेऊळ घालीत आहेत तिकडे पहा.

[खलाशी जातात.]

हे वाऱ्या, तुझें सर्व अवसान निघून जाईपर्यंत जरी तूं वाहालास तरी चिंता नाहीं. देवानें आह्मांस जमिनीपासून समुद्रांत दूर राखिलें ह्मणजे आह्मी डगत नाहीं.

[आलोंझो, फर्दिनान्द, सिबास्थियन, आन्तोनिओ, गोंझालो, व इतर येतात.]





**आलोंझो**—अहो भले मोकद्दम, चांगली खबरदारी ठेवाहो. पण तांडेल कोणीकडे गेले आहेत? हिम्मत धरून आज चांगला पुरुषार्थ करा.

**मोकद्दम**—महाराज, आपण जरा मेहेरबानी करा आणि या वेळेस खालींच रहा.

**आन्तोनिओ**—मोकद्दम, अहो तांडेल कोठें आहेत?

**मोकद्दम**—काय तो तिकडे हळ्या मारीत आहे, तें तुम्हांस ऐकूं येत नाहीं? आमची काय गडबड होऊन राहिली आहे. त्यांत अणखी तुमचा काय ह्मणून व्यत्यय! तुह्मीं आपआपल्या खोल्यांत जाऊन बसा. या तुमच्या अशा धांदलीनें तुफानास जोर मात्र गावतो.

**गोंझालो**—कांहीं असेंच नका करूं मोकद्दम बुवा! कांहीं थंडे तर व्हा.

**मोकद्दम**—दर्या थंडा होईल मग आह्मीबी. तुह्मी चला येथून; राजाची परवा या खवळलेल्या लाटा थोड्याच करणार आहेत! चलाहो तुह्मीं निघून आपापल्या खोलींत; चप रहा; आह्मांस त्रास देऊं नका.

**गोंझालो**—पण गृहस्था, जहाजावर कोण कोण मंडळी आहे याची तुला आठवण असूं दे.

**मोकद्दम**—कोणी जरी असले तरी ते माझ्या जिवापेक्षां मला कांहीं प्यारे नाहींत. आपण तर मोठे मंत्रीच आहात. पाहूं बरें येथें कांहीं आपला मंत्रतंत्र या चवताळलेल्या भुतांवर चालतो कीं काय! जर आपण सर्व सुरू कराल तर आह्मांस हीं दोरखंडें ओढण्याचें काम काय? चालवा पाहूं आपला अम्मल येथें! आणि आपल्या आंगीं तशी कांहीं करामत नसेल तर एवढा वेळ वांचला याचेंच उपकार

माना. आणि न जाणो काय होतें तें. जर तसाच वक्त गुदरला तर आपली तयारी असूं द्या.—भलेरे भले दादाहो, चालूं द्या!—पण तुह्मी जा हो कसे येथून मी सांगतोंनी.

[निघून जातो.]

**गोंझालो**—या मूर्तीस पाहून मला मोठें समाधान होतें; कारण याच्या चर्येवरून मला वाटतें हा बुडून मरावा असें याच्या कपाळीं लिहिलेलें नाहीं. मग याचे गळ्यास फांस लावून यास स्वर्गीं पाठवितील असें याच्या चर्येवरून स्पष्ट दिसतें. हे भल्या दैवा, तूं आपला हेका येथें चालीवच. याच्या नशिबीं जी लिहिलेली दोरी आहे तिचाच आमच्या रक्षणास बळकट दोर करून ठेव; कारण आह्मांस वाटतें कीं आमचे नशिबाचे दोर आतां कांहीं काम देणार नाहींत. जर ह्या बेट्याचे नशिबीं फाशी लिहिलेली नसेल तर आतां आमची शेवटचीच वारी आली खरी. [सर्व जातात.]

[मोकद्दम पुन्हा येतो.]

**मोकद्दम**—पाडा खालीं डोलकाठी; पाडा पाडा; अरे जलदी करा; उतरा सारीं अवझारें. [पडद्याच्या आंतून किंकाळ्या ऐकूं येतात] जळोरे हें यांचें ओरडणें! यांच्या गोंगाटापुढें वाऱ्याचा सुसाटा व आमचें कामकऱ्यांचें ओरडणें ह्मणजे कांहींच नाहीं.

[सिबास्टियन, आन्तोनिओ, आणि गोंझालो हे पुन्हा येतात.]

काय आपण पुन्हा आलात? आपणाला काय येथें पाहिजे? सर्व काम सोडून बसूं तर आह्मी स्वस्थ? आपले मनांत जलसमाध तर नाहीं घ्यायची?

**सिबास्टियन**—किडे पडोत या बेट्याचे तोंडास. काय लुच्चा पहा अभद्र कुत्र्यासारिखा बरळतो आहे!

**मोकद्दम**—मग घ्या तर घ्या, तुह्मींच संभाळा हें काम आतां.

**आन्तोनिओ**—द्या ह्या गुलामाला फाशीं. अरे रांडलेका, उन्मत्ता, तूं बुडण्यास भितोस तसे आह्मीं नाहीं भीत.

**गोंझालो**—अहो त्याच्या बुडण्याची गोष्टच बोलूं नका. तो बुडून मरणार नाहीं हें मीं तुह्मांस खात्रीनें सांगतों. एकाद्या नारळाच्या कवटीसारिखें जरी हें जहाज हलकें असतें, तरी यास जहाज बुडून ह्मणून मृत्यु येणेंच नाहीं.

**मोकद्दम**—अरे, जहाजास वाऱ्याच्या तोंडाकडे करा; करा वाऱ्याच्या तोंडाकडे. दोनीही अवझारें उभारून पुन्हा ढकला जहाजास पाण्यांत. ढकला, अरे ढकला.

[ सर्वांग भिजलेले खलाशी येतात. ]

**खलाशी**—सर्व हातचें गेलें! आतां देवाचें नांव येईल तर घ्या. सर्व हातचें गेलें! [ निघून जातात. ]

**मोकद्दम**—अरे, बोलून बोलून माझें तोंड सुकलें तरी तुह्मीं ऐकूच नये?

**गोंझालो**—राजा आणि राजपुत्र आतां मरणोन्मुख होऊन शेवटची प्रार्थना करीत आहेत; चला आपणही तसेंच करूं; कारण आमचीही पण शेवटचीच बारी आली आहे.

**सिबास्टियन**—माझें तर बा रागामुळें भान गेलें.

**आन्तोनिओ**—कांहीं नाहीं हो! केवळ या असल्या दारूबाज लोकांच्या हातीं सांपडल्यानें आज आपण प्राणास मुकत आहोंत. हा पहा, सोदा उग्रतोंड्या. हा दहा भरत्या येईपर्यंत असाच समुद्रांत गटांगळ्या खात राहो!

**गोंझालो**—तुह्मी कांहीं ह्मणा, पण याचें मरण फाशीशिवाय येणेंच नाहीं. समुद्रांतील पाण्याच्या प्रत्येक थेंबानें

तरी याचें कांहीं व्हावयाचें नाहीं. [पडद्यांत एकच कल्होळ होतो.] "अरे ईश्वरा, आह्मांवर करुणा कर!" "आमचे तुकडे तुकडे रे होतात"!—"हे स्त्रिये, रे बाळानो, हे बांधवा, तुह्मांला आतां आमचा हा शेवटचाच रामराम." "अरेरेरे मेलों रे मेलों!"—

**आन्तोनिओ**—चला, सर्व आपण मिळून राजेसाहेबा-बरोबरच तळास जाऊं. [जातो.]

**सिबाश्चियन**—चला आतां आपण राजेसाहेबाची शेवटची मुलाकात करूं. [जातो.]

**गोंझालो**—या वेळेस सुक्या जमिनीचा जर कोणी एक बिघा मला देईल, तर मी त्याच्या मोबदला त्यास हजारों कोश समुद्राचा मालक करीन. मग ती जमीन कितीही खराब कां असेना; तिजवर नुसता कासळाच कां उगवेना; किंवा नुसतीं खुरटलेलीं शमीचीं झाडेंच कां उगवेनात; किंवा कांहींच कां न उगवेना. पण काय करावें ईश्वरेच्छे-पुढें उपाय नाहीं! मरण जर स्वाधीन असतें, तर मी खचित सुक्या जमिनीवरच मेलों असतों. [जातो.]

प्रवेश १ ला समाप्त.

---

बेटामध्ये प्रोस्पेरोच्या गुहेपुढील जागा.

[प्रोस्पेरो आणि मिरांदा येतात.]

**मिरांदा**—बाबा, जर हें तुफान तुह्मीं आपल्या मंत्रविद्येनें उपस्थित केलें असेल, तर या उचंबळलेल्या लाटांस शांत करा. आकाश असें धुंद होऊन गेलें आहे कीं आपल्या मुखांतून सुस्काऱ्याबरोबर वाईट धुराचे लोटचे लोट जसें काय तें टाकण्याचेंच तयारींत आहे; परंतु या लाटा अशा उंच जातांहेत कीं त्या गगनाचे मुख मंडळावर चढून गालांपर्यंत पोंचून तेथून त्या धुराचें कारण जो अग्नि त्यास जशा कांहीं दूरच करिताहेत! बाबा, ज्यांस आज मीं दुःखांत पडून बुडतांना पाहिलें, त्यांच्या त्या वेदना जशा मलाच सोसाव्या लागल्या असें दुःख झालें आहे. एक सुंदर जहाज—त्यामध्यें खरोखर कोणी ईश्वराचा लाल असावा—तें धाडकर आपटून नाश पावलें! हरहर! त्यावेळीं जो जहाजांवर आकांत झाला त्याची धडकी माझ्या काळिजांत भरली आहे. गरीब बिच्यारे प्राणी, ते सर्व मेले! मजमध्यें जर कांहीं दैविक शक्ति असती तर या समुद्रांत असें सुंदर जहाज बुडून त्यामधील सर्व प्राण्यांनीं मरावें, त्यापेक्षां पूर्वींच या मेल्या समुद्रासच रसातळास नेऊन घातलें असतें!

**प्रोस्पेरो**—तुझें चित्त स्वस्थ राख. अशी घाबरी होऊं नको. आपल्या दयार्द्र अंतःकरणास असें सांग कीं कोणासही कांहीं यापासून इजा पोंचली नाहीं.

**मिरांदा**—हरहर! कायग बाई तरी दुःखाचा दिवस हा!

कं, माझे मुली, हें सर्व मी तुझ्या बऱ्याकरितांच केलें. बेटा, तुला माहित नाहीं, कीं तूं कोण आहेस, व मी कोठचा व कोठून आलों. तुला वाटत असेल कीं प्रोस्पेरो ह्मणजे काय! या अस्वया भिकार मठीचा यजमान आणि तुजसारिख्या गरीब पोरीचा बाप.

**मिरांदा**—खरेंच बाबा; आजपावेतों यापेक्षां कांहीं जास्ती असेल तें समजून घ्यावें अशी कल्पना देखील माझें मनांत आली नाहीं.

**प्रोस्पेरो**—तुला आतां त्याविषयींची ज्यास्ती माहिती करून देण्याचा तो हाच समय आहे. कर तुझे हात इकडे, आणि मला माझे हा आंगावरील भारलेला झगा काढूं लाग. ठीक; हे माझ्या मंत्रविद्येच्या भांडाररूप झग्या, पड तूं येथें [असें ह्मणून झगा खालीं ठेवितो.] मुली, तूं आपले डोळे पूस. असें दुःख करूं नकोस. जहाज फुटण्याचा जो दुःखकारक प्रसंग तूं आतां पाहिलास आणि ज्यायोगें तुझें सुहृदंतःकरण इतकें कळवळलें, त्यांत माझ्या मंत्रसामर्थ्यानें मीं अशी सोय काढून ठेविली आहे कीं, जाहाजावरील कोणाच्या प्राणास तर काय, पण एका केसासही धका न पोंचे. ज्या जहाजांतील लोकांच्या किंकाळ्या त्वां ऐकिल्यास, व जें जहाज प्रत्यक्ष त्वां तळीं जातांना पाहिलेंस, त्यांतील सर्व प्राणी सुरक्षित आहेत. ये, बैस अशी खालीं; कारण तुला आतां विशेष हकीकत समजली पाहिजे.

**मिरांदा**—तुम्हीं पुष्कळ वेळां माझी मूलपीठिका सांगण्यास म्हणून प्रारंभ करितां, पण मध्येंच थांबून, मी सांगा

**प्रोस्पेरो**—तुला सांगण्याचा मुहूर्त तो आतां आला आहे. या क्षणींच तुला कान उघडून नीट ऐकिलें पाहिजे. तर आतां सावधान चित्त देऊन ऐक कशी. आपण या बेटांत आलों त्यापूर्वींचे दिवसांची कांहीं तुला आठवण आहे? मला वाटतें तेव्हांची कसची तुला आठवण राहणार! तेव्हां तूं [illegible], पुरी तीन वर्षांची देखील नव्हतीस.

**मिरांदा**—खरेंच, बाबा, पण मला आठवतें.

**प्रोस्पेरो**—तुला काय आठवतें! तुला कांहीं एखादें दुसरें घर किंवा कांहीं एखादें माणूस आठवतें? ज्या कशाचें स्वरूप तुझ्या आठवणींत येत असेल तें मला सांग पाहूं!

**मिरांदा**—या गोष्टीला पण पुष्कळ पुष्कळ दिवस झालेसें वाटतें; व जें मला आठवतें तें आठवणीनें ज्याची खात्री असते तसें नाहीं भासत, केवळ स्वप्नांतल्याप्रमाणें भासतें. पण मला घेण्यास तेव्हां चारपांच बाया नसत काय?

**प्रोस्पेरो**—मिरांदा, चारपांच तर काय, पण यांहूनही पुष्कळ होत्या. पण अझूनपर्यंत यागोष्टीचा वास तुझे मनांत कसागे राहिला! याशिवाय या गत तमोमयी व महाविवररूपी कालामधील वर्तमान दुसरें कांहीं तुला आठवतें काय? येथें येण्याच्या पूर्वींची ही जर गोष्ट तुझे ध्यानांत आहे, तर येथें आपण कसे आलों हेंही तुला आठवत असेल.

**मिरांदा**—पण तें कांहीं नाहीं आठवत मला.

**प्रोस्पेरो**—मिरांदा! आज बारा, पूर्ण बारा वर्षें त्या गो-

... बाबा !

**प्रोस्पेरो**— तुझी आई केवळ सद्गुणांची पुतळी होती, आणि ती तर तुला माझीच मुलगी असें म्हणे. तुझा बाप मिलन् येथील ड्यूक होता. आणि तूंही त्यास शोभण्यासारिखी एकुलती एक राजकन्या होतीस.

**मिरांदा**— अरे देवा! कोण्या दुष्टानें तर असें कपट करून आह्मीं तेथून निघावेंसें केलें? पण आपलें येथें येण्यांत कांहीं हित तर नाहीं झालें?

**प्रोस्पेरो**— मुली त्यांत दोन्हीही गोष्टी झाल्या. तूं ह्मणतेस त्याप्रमाणें कपटानेंच तेथून आमचा पाय उखडला; परंतु आपण मोठ्या नशिबाचे म्हणूनच येथें सुखरूप येऊन लागलों.

**मिरांदा**— अरेरे! त्याप्रसंगीं माझ्याकरितां तुम्हांस जे कष्ट भोगावे लागले असतील त्यांचा विचार आतां मनांत येऊन माझें अंतःकरण केवळ घायाळ होतें. ती गोष्ट पण आतां माझे लक्षांत देखील नाहीं. कृपा करून पुढें सांगा गोष्ट.

**प्रोस्पेरो**— माझा भाऊ, तो तुझा चुलता, ज्याला आन्तोनिओ म्हणत— पण तूं ऐकत आहेसना ? — भाऊ होऊन काय त्याची सोदेगिरी! या भावावर या जगांतील, तुजखेरीज करून, सर्वांपेक्षां माझी प्रीति अधिक होती; आणि म्हणूनच राज्यकारभार मीं याजवर सोंपिला. त्यावेळीं सर्व मोठमोठ्या संस्थानांमध्यें मिलन् संस्थान प्रमुख होतें; व तेथील ड्यूक जो मी तो, सर्व उत्तम कलांमध्यें अनुपम प्रवीण होत्साता, सर्व ड्यूकांमध्यें अग्रेसर होतों. माझा सर्व भर

अभ्यासांत असल्यामुळें संस्थानाचा कारभार सर्व मीं आपल्या या भावावर सोंपिला. अगम विषयांच्या अभ्यासामध्यें केवळ तल्लीन झाल्यानें मी माझ्या गादीस पारखा झालों. तो तुझा सोदा काका— पोरी, परंतु तूं ऐकते आहेस ना?

मिरांदा— माझें सर्व लक्ष तुमच्या गोष्टीकडेस आहे.

प्रोस्पेरो— एकदां त्यास कोणाचें म्हणणें मान्य करावें, कोणाचें न करावें, कोणास वाढवावें, व कोणाचे गळ्यांत कांहीं तरी लोढणें बांधून त्यास कुंठित करावें, हें नीट समजूं लागल्यावर, माझ्या हातें नांवारूपास आलेल्या लोकांस यानें जसें काय नवेंच बनवून सोडिलें; काय सांगूं, त्यांस अगदीं पालटून सोडिलें. त्यांचें पहिलें स्वरूप बदलून नवेंसें केलें: सर्व राज्यांतील अम्मलदार बनविणें व तसेंच त्यांपासून काम घेणें या दोनही गोष्टींची किल्ली त्याच्या हातीं गेल्यामुळें, जसा स्वरस्थान जाणणारा गायक आपलें वाद्य अंकित करून ठेवितो, त्याप्रमाणें यानें कामगारांस केवळ बाहुलीं करून ठेविलें. व मग, ज्याप्रमाणें द्विहिनामक वेल प्रचंड झाडाच्या बुंधास वेष्टन घालून त्यास बळकट करकोचे पाडून त्यांतील जीवनरस निश्शेष शोषून त्याचा केवळ लोप करून टाकितो, व त्याच्याच गारव्यानें आपण फैलावतो त्याप्रमाणें, या स्वारीनें आम्हांवर झाकण टाकिलें.—पोरी, पर तुझें चित्त आहे कोठें इकडे?

मिरांदा— काय म्हणावें, बाबा, तुम्हांला! मी एकसारखी ऐकत आहें.

प्रोस्पेरो— मग इकडे लक्ष्य दे तर कशी. याप्रमाणें या जगांतील सर्व लाभांची मीं हेळसांड करून, एकांतवासांत राहून सविनय अलौकिक रीत्या महाभ्यास करून, आपल्या

मनाची सुधारणा करण्याकडेस आपला सर्व प्राण अर्पिल्यामुळें माझ्या भावाच्या मनामध्यें पाप उद्भवलें. आणि त्याचे-ठायीं जो माझा विश्वास, त्या विश्वासास जशी सूर्याचे पोटीं हिरकणी, तशीं या भावापासून अनृताचीं फळें आलीं. तीं, माझा विश्वास जसा मोठा त्याप्रमाणेंच, अतिशय विपरीत होतीं. खरोखर माझा विश्वास तर अमर्याद, त्यास कांहीं साठवण म्हणून नव्हतेंच. याप्रमाणें माझ्या राज्याचा होणारा चट सारा वसूल, व याशिवाय माझ्या सद्दीच्या जोरानें वश होणाऱ्या दुसऱ्या आणिक गोष्टी, या सर्व त्याच्या हातीं गेल्यावर, ज्याप्रमाणें एकादा सत्यापवादी अनृत वदतां वदतां, आपल्या धारणाशक्तीस अशा महत् पापांत टाकितो कीं, आपणच उठविलेल्या कंड्या आपणच खऱ्या अशा मानूं लागतो, त्याचप्रमाणें, या लुच्चयासही आपण ड्यूकच खरोखर आहोंत असें वाटूं लागलें. मीं आपले जागीं त्यास मुतालीक केलें होतें, व बाह्य राजचिन्हें व राजकुलांत उत्पन्न झालेल्या गादीच्या मालकानें घेणें ते हक्क यास भोगावयास मिळाले म्हणून त्याची दुर्निवार आशा वृद्धिंगत होऊं लागली. पण तूं ऐकते आहेसना?

**मिरांदा** — बाबा, आपली गोष्टच अशी सुरस आहे कीं तिच्या योगें एकाद्या बहिऱ्यासही कान यावेत.

**प्रोस्पेरो** — मग त्यास असें वाटूं लागलें कीं, आपण सर्व राजचेष्टा करितोंच आहों, तर हा जो मध्यें प्रोस्पेरोचा पडदा आहे, हा तरी कशास? सर्वस्वी मिलनचे ड्यूक आपण बनलें पाहिजे. माझें गरिबाचें तर काय! मला आमचें पुस्तकालयरूप राज्यच मोठें झालें होतें. पुढें त्यास असें वाटूं लागलें कीं, मीं राज्य करण्यास असमर्थ आहें. काय, तरी,

ही त्याची राज्यतृष्णा!—त्यानें वर्षाचे वर्षास खंडणी व स्वामित्वाबद्दल नजराणा देण्याचें कबूल केलें, आणि आपलें राज्य त्याच्या राज्याखालीं घालून आपण त्याचे आश्रित असें कबूल करून कीं गे नेपल्सच्या राजाशीं संधान बांधिलें! आपले गादीस त्याचे पायांवर लोळवून, आजपावेतों अशा दुर्गतीस कधींच न गेलेल्या मिलन संस्थानास, धुळीस कीं गे मिळविलें. हर हर! काय संस्थाना तुझी दुर्दशा तरी ही!!

**मिरांदा**—अरे देवा!

**प्रोस्पेरो**—अगोदर त्याच्या कबुलायती, व त्यांपासून निष्पन्न जें झालें तें तर ऐक, आणि मग सांग कीं अशाला भाऊ तरी म्हणावें काय?

**मिरांदा**—मीं आपल्या आजीबाई विषयीं कांहीं भलतीच कल्पना केली तर दोषास पात्र होईन; कां कीं चांगल्या आयांच्या पोटींही कुपुत्र निपजले आहेत.

**प्रोस्पेरो**—ऐक तर त्याची कबुलायत. नेपल्सचा राजा माझा हाडवैरी होता, म्हणून त्यानें माझ्या भावाचें म्हणणें मान्य केलें, व वर ज्या आमच्या भावानें कबूल केलेल्या गोष्टी सांगितल्या, व काय जो खंड देण्याचा कबूल केला असेल तो, याबद्दल सत्वर माझ्या राज्यांत माझें आणि माझ्या अपत्याचें नांव समूळ न राहील, असें करण्याचें व मिलनच्या सुंदर संस्थानांचें आधिपत्य; व त्यासंबंधाचे सर्व मानपान माझे भावास देण्याचें नेपल्सच्या राजानें कबूल केलें. मग संकेतानुरूप त्यानें एक बदमाष सैन्य जमविलें, आणि ज्या मध्यान्हरात्रीस हा डाव साधावयाचा त्या रात्रीस आन्तोनिओनें त्यास वेशी उघडून मिलन शहरांत घेतलें, आणि मध्यान्हरात्रीच्या अमलांत, हें काम ज्यांस सोंपवि-

**मिरांदा**—अरेरे! काय निष्ठुरता ही! त्यावेळेस मी कशी रडलें असेन त्याची मला आतां आठवण नाहीं; ह्मणून मी आतां पुन्हां रडून घेतें. तुमचें बोलणें केवळ अश्रुप्रेरकच आहे.

**प्रोस्पेरो**—आणिक थोडेसें ऐक. आणि मग आतां आपणांस जें करणें आहे त्याविषयीं तुला सांगतों. या कामाच्या संबंधानें ह्मणून ही गतगथा सांगायाची; नाहीं तर हें व्यर्थ दुःखकथन केवळ अप्रयोजक झालें असतें.

**मिरांदा**—पण त्यांनीं आपणांस मारून टाकायाचें कसें सोडिलें?

**प्रोस्पेरो**—ठीक पुसलेंस बेटा: माझ्या गोष्टीपासून असा प्रश्न निघायाचाच. मुली, तसें करण्याचें त्यांना धैर्य नव्हतें; कारण माझे प्रजेची मजवर फार मेहरबानी होती; आणि त्यांनीं हा जो व्यापार मांडिला, तो असा क्रूर आहे असें न दाखवितां, आपला लाग बाह्यात्कारें साजऱ्या गोजऱ्या रीतीनें, त्यांनीं आपले मतें, साधण्याची ही एक शकल काढली—सांगायास कारण कीं, त्यांनीं आह्मांस तशी घाई करून एका लहान जहाजावर नेलें. आणि कित्येक कोसपर्यंत ते तसेच आमचे बरोबर आले; येथें त्यांनीं एक किडकी—मुरदाड नाव आणिली—ना तिला कोठें धरण्यास दोऱ्या, ना नाडे, ना अवशार, ना डोलकाठी, ना कांहीं, फार तर काय? उंदीर देखील त्या नावेची अवस्था पाहून उपजत बुद्धीनेंच तीस सोडून गेले होते. त्यांनीं आह्मांस अशा नावेंत निराश्रय बसवून नाव समुद्रांत ढकलली. त्यावेळेस करुणा भाकण्यास





आमचे जवळ कायतो समुद्र, त्यानें तर आपलें गर्जणें सोडि-लेंच नाहीं. व आमचे सुस्कारे ऐकण्यास काय तो वारा; तो तर आमच्या सुस्काऱ्याबरोबर प्रतिसुस्कारा टाकून या अशा विलक्षण स्नेहानें आम्हांस खराबच करीत गेला.

**मिरांदा**—अरेरे! त्या वेळेस मजकरितां तुम्हांस कितीतरी अडचण सोसावी लागली असेल!

**प्रोस्पेरो**—छे! त्या वेळेस माझें तुझ्याच योगें तर देवा-प्रमाणें रक्षण झालें. समुद्राच्या पाण्यावर जेव्हां माझ्या डोळ्यांतून टपटप समुद्रजलाप्रमाणें क्षारअश्रु पडत होते, व मी दुःखभारानें सुस्कारे टाकीत होतों, त्या वेळेस तुजकडे पाहिलें तों तूं जशी काय ईश्वरप्रेरित धैर्यानेंच हंसत आहेस, असें पाहून आपणांवर कोसळणारीं दुःखें सोसण्याची उमेद माझे मनांत आंतले आंत उद्भवली.

**मिरांदा**—पण आपण जमीनीस कसे येऊन लागलों?

**प्रोस्पेरो**—केवळ देवाचे कृपेनें! निआपोलिस शहरांतील गोंझालो नामक भल्या मनुष्यास त्या कामाची जिकडच्या तिकडे व्यवस्था करण्यास मुखत्यार नेमिलें होतें. त्या बिचाऱ्यानें परोपकार बुद्धीनें आपले बरोबर कांहीं अन्न, थोडेसें गोडें पाणीं, व तसेंच कांहीं उंचे उंचे पोषाख, कांहीं जगन्नाथ्या, व त्याप्रमाणें दुसरे अवश्य लागणारे पदार्थ, व असेंच कांहीं सटरफटर दिलें होतें. त्यानें आजपावेतों बराच गुजारा झाला. व त्यास माहित होतें कीं, माझी माझ्या पुस्तकांवर मोठी भक्ति आहे; म्हणून त्यानें ममतेनें, मी राज्यापलीकडे ज्यास मानितों, अशीं कांहीं पुस्तकें माझे ग्रंथालयांतून मज-बरोबर दिलीं.

**मिरांदा**—ह्या मनुष्यास कधीं तरी एकदां डोळ्यांनीं पहावें असें वाटतें.

**प्रोस्पेरो**—[इतक्यांत आकाशांत एरियल येतो त्याजकडे पाहून.] अरे हा मी आतां उठलों. [आपला झगा पुन्हां घालतो] [मुलीस] उगीच बैस, आणि समुद्रापासून घडलेल्या आपल्या दुःखाचा शेवट ऐक. एकदां कसे तरी आह्मीं या बेटास येऊन लागलों. आणि येथें आल्यावर मीं तुझा गुरु होऊन इतर राजकन्यकांपेक्षां तुला शहाणें केलें आहे; इतर राजकन्यांचा वेळ निरुपयोगी कामांत पुष्कळ जातो. आणि त्यांस, तुला जसा मी काळजी वाहाणारा पंतोजी सांपडलों आहें, तसे आंतडीं कळकळणारे पंतोजी-ही कोठें असतात?

**मिरांदा**—याजबद्दल ईश्वर तुमचें कल्याण करो. पण बाबा, अजूनही तें माझ्या मनांत कसें धडधड करितें आहे. कृपाकरून तुह्मीं हें वादळ कायह्मणून उठविलें तें सांगा.

**प्रोस्पेरो**—हें सांगतों एवढेंच ऐकून घे. [विलक्षण कर्मधर्मसंयोगानें आज दैव मजवर फिदा होऊन उदार झालें आहे. त्यानें आज माझे सर्व शत्रु या बेटाच्या किनाऱ्यास आणून लाविले आहेत. आणि माझ्या अंतर्ज्ञानानें मला असें समजत आहे कीं आज माझे उत्कर्षस्थानीं एक अनुकूल ग्रह आला आहे. आणि हा योग जर मीं घालविला तर पुढें माझें दैव सदोदीत पंगुच राहील.] आतां उगीच बैस आणि कांहीं प्रश्न पुसूं नकोस. तुला झोंप येत आहे असें दिसतें; तर तूं नीज; कारण ही झोंप फार चांगले वेळेवर आली आहे. [मिरांदा झोंपीं जाते] या मंत्रप्रेरित झोंपेपुढें तुझा उपाय चालणार नाहीं, हें मी जाणतोंच.

असेल तें बजावण्यास मी येथें हजर आहे. [illegible] आभाळांत उडण्यास सांगितलें, पाण्यांत पोहण्यास सांगितलें, शिलगलेल्या खाईत उडी टाकण्यास सांगितलें, किंवा वेटाळलेल्या ढगावर स्वारी करण्यास सांगितलें तरी हा एरियल आपल्या सर्व शक्तींनीं तीं तीं कामें करण्यास तयार आहे. सांगा मला.

**प्रोस्पेरो**—हे पिशाचा, तुला जसें मीं तुफान उठविण्यास सांगितलें होतें तसें तूं बराबर केलेंस कीं नाहीं?

**एरियल**—शब्दशः आपण ह्मटल्याप्रमाणें मीं तुफान उसळविलें. मी राजाच्या जाहाजावर उडी मारून गेलों; व जहाजाच्या चव्हुपुठावर, व कमरग्यावर व मजल्यावर प्रत्येक खोलींत, आतां येथें मग तेथें, असें ज्वालारूपानें प्रवेशून सर्वांस घोटाळ्यांत पाडिलें. मध्येंच केव्हां केव्हां मीं अनेक ज्वालारूपें धारण करून एकदम बहुत ठिकाणीं भडक करून द्यावें—डोलकाठीवर, परमान्यावर व नाळदांड्यावर आग लागली आहे असें मीं एकदम दाखवावें; आणि मग पुन्हां त्या सर्व ज्वाला एके ठिकाणीं कराव्या; अशी धांदल करून सोडिली. याप्रमाणें डोळ्याचें पात्यास पातें न लागे इतकी जलदी, व असें चांचल्य इंद्राच्या विद्युल्लतेच्या आंगींही भयंकर वादळाच्या गडबडाट प्रसंगीं देखील कधीं आलें नसेल. महाप्रचंड जो सागराचा स्वामी त्यास आगीनें आणि गंधक-

मय सुरुंगांनीं वेढा घातल्याप्रमाणें दिसूं लागलें. आणि त्याच्या योगें समुद्राच्या लाटा थर्थर कांपूं लागल्या हें तर काय, परंतु त्याचे हातांतील भव्य मानदंड जो त्रिशूल त्याची देखील गडबड होऊन गेल्यासारिखें झालें.

**प्रॉस्पेरो**—वहावारे शूर पिशाच! पण त्या मंडळीमध्यें असा धीर, असा हिम्मतवान कोणी होता, कीं ज्याची बुद्धि अशा घोटाळ्यांतही वृत्तीवरच होती?

**एरियल**—त्या जहाजावर असा एकही प्राणी नव्हता कीं ज्यानें भीतीनें बावरून निराशेमुळें कांहीं वेडे वेडे चार केलेच नाहींत. एक खलाशी मात्र खेरीजकरून बाकी सर्वांनीं फेसाळलेल्या त्या समुद्रांत भराभर उड्या टाकिल्या, आणि जहाजाचा त्याग केला. तेव्हां माझी तर काय गडबड होऊन राहिली होती. राजाचा मुलगा फर्दिन्द, याच्या डोकीवरचे केश भयानें ताठ उभे राहिले. जणु काय ते केश नव्हेत, जाडें गवतच: त्यानें "आज नरक रिकामा पडून सर्व त्यांतील भूतें या जहाजावरच आलीं आहेत" असें ह्मणून प्रथमत: समुद्रांत उडी घातली.

**प्रॉस्पेरो**—ठीक केलेंस पिशाचा! पण हें अगदीं जमीनीजवळ झालें ना?

**एरियल**—होय, मालिक, अगदीं नजीक.

**प्रॉस्पेरो**—पण, एरियला, ते सर्व सुरक्षित आहेत ना?

**एरियल**—कोणाच्या केशासही धक्का लागला नाहीं. त्यांचें आंगावरील कपड्यास एक डाग देखील पडलेला नाहीं. ते उलटे पहिल्यापेक्षां उजळ दिसताहेत. मीं आपल्या हुकुमाप्रमाणें जहाजावरील लोकांस ठोक्या टोळ्यांनिशीं सर्व बेटभर फैलाविलें आहे. राजपुत्रास मात्र एकटाच बेटा-

तील एका किचबिड कोनांत आणून ठेविलें आहे. तो हातांत हात घालून दुःखानें शरिराचा गोळा करून, हवेस जसें काय निववीतच आहे, याप्रमाणें सुस्कारे टाकीत बसला आहे.

**प्रॉस्पेरो**—राजाचें जहाज, व त्यावरील खलाशी यांची तूं कशी काय व्यवस्था केली आहेस, ती सांग. आणि राजाबरोबर आलेल्या आरमाराचीही हकीकत सांग.

**एरियल**—राजाचें जहाज बंदरामध्यें सुखरूप आहे. ज्या खोल वाकणामध्यें तुम्ही मला एकदां बोलावून सदोदीत अस्वस्थ जें बरमुदाचें बेट, तेथून दव आणण्यास सांगितलें होतें, त्यांत तें जहाज लपवून ठेविलें आहे. सर्व खलाशी जहाजाचे तळघरांत भरले आहेत. आणि अगोदर त्यांस श्रम झालेले, त्यांत मी मंत्र टाकल्यामुळें, ते गाढ निद्रित झाले आहेत. दुसरीं जीं पुष्कळ जहाजें आलीं होतीं, व ज्यांची मीं फुटाफूट केली होती, तीं आतां एकत्र जमून, राजाचें जहाज प्रत्यक्ष बुडतांना आपण पाहिलें व राजासही बुडतांना पाहिलें, असें समजून निराश होऊन नेपल्स देशांत परत जाण्यास भूमध्यसमुद्रावर चालत आहेत.

**प्रॉस्पेरो**—एरियला, तूं सांगितलेली कामगिरी उत्कृष्ट बजाविलीस खरी, परंतु अजूनही काम करणें बाकी राहिलें आहे. दिवस आतां किती चढला असेल बरें ?

**एरियल**—दोन प्रहर तर होऊन चुकले.

**प्रॉस्पेरो**—निदान दोन घटिका वर गुदरल्या असतील. एव्हांपासून साहावाजेपर्यंत जी फुरसत सांपडेल ती व्यर्थ घालवितां नये. तींत पुष्कळ कामाचा उलगडा केला पाहिजे.

तुम्हीं मला जें वचन दिलें आहे त्याची आठवण मी तुम्हांस देतों; कारण बोलल्याप्रमाणें कांहीं तुम्हीं अझून केलें नाहीं.

**प्रोस्पेरो**—कां! तुला त्रास आला आहे कीं काय! आठवण देऊन तूं काय मागणार?

**एरियल**—माझी सुटका करावी इतकेंच मागणें.

**प्रोस्पेरो**—काय? मुदत संपण्याचे अगोदरच? बोलूं नकोस असें; अठप जीभ.

**एरियल**—माझी अशी विनंती आहे कीं आपली कशी चाकरी केली आहे याची आपणांस आठवण असूं द्यावी. मी आपल्यापाशीं कधीं लबाड्या सांगितल्या नाहींत; कधीं चुकया केल्या नाहींत; आणि सांगितलेल्या कामगिऱ्या कुरकुर केल्याशिवाय चट साऱ्या बजाविल्या. मुदतींत एक वर्ष कमी करण्याचें आपण वचन दिलें होतें.

**प्रोस्पेरो**—कसल्या कष्टापासून तुझी मीं मुक्तता केली तें तूं विसरलास वाटतें!

**एरियल**—नाहीं.

**प्रोस्पेरो**—नाहीं कसें! होय. कारण खाऱ्यासमुद्राच्या खड जमीनीवरून मजकरितां चालणें, व उत्तरेकडील थंड वाऱ्यावर स्वारीकरणें, आणि जमिनीवर जेव्हां बर्फाचे पापुद्रे जमतात तेव्हां तिच्या भेगांत शिरून काम करणें असलीं पण कामें आतां तुला महत् कष्टाचीं वाटूं लागलीं आहेत, अं!

**एरियल**—छे, महाराज, मला नाहीं वाटत.

**प्रोस्पेरो**—खोटें बोलतोस पापरूप्या. अरे, वार्धक्यामुळें आणि मत्सरामुळें जिची केवळ कमान बनून गेली

होती, अशा त्या दुष्ट सायकोरांक्स नांवाच्या भुताळीस विसरलास? काय, तुला तिची आठवण नाहीं काय?

**एरियल**—महाराज, तिला मी नाहीं विसरलों.

**प्रॉस्पेरो**—विसरलासच आहेस गुलामा, सांग तर पाहूं ती कोठें जन्मली?

**एरियल**—महाराज, ती आल्जीयर्स देशांत जन्मली.

**प्रॉस्पेरो**—हें पण खरेंच कीं काय? महिन्यांतून तुझी पूर्वीची स्थिति कशी काय होती याचा पाढा तुजजवळ एकदां वाचला पाहिजे असें दिसतें; कारण तूं विसरतोस. ही जी दुष्ट भुताळी सायकोरांक्स इनें अतिशय त्रास मांडिला व मनुष्यांनीं कानांनीं ऐकूं नयेत अशीं चेटकें केलीं; ह्मणून इला आलजीयर्स देशांतून हाकून दिलें होतें, हें तूं जाणतोसच. तिनें एक कामगिरी बजाविली होती ह्मणून तेथील लोकांनीं तिचा जीव मात्र घेण्याचें सोडिलें. कां ही गोष्ट खरी कीं खोटी?

**एरियल**—खरी, महाराज.

**प्रॉस्पेरो**—या काळेमिट डोळ्याचे थेरड्या डाकिणीस ती गरोदर असतां या बेटावर आणून सोडिलें. आणि तूंच गुलामा सांगतोस कीं, तूं तिचा चाकर बंदा गुलाम होतास. आणि तूं पिशाच असतांही तिनें ज्या तुला कंटाळवाण्या व ओंगळ कामगिऱ्या सांगितल्या त्या तुझ्याच्यानें करवेनात; ह्मणून त्या तुझ्या स्वामिणीच्या आज्ञा जेव्हां त्वां नाकारिल्यास तेव्हां तिनें अनिवार्य रागाच्या सपाट्यांत तुला, तिच्या सेवेंत जीं आणिक बलाढ्य पिशाचें होतीं त्यांच्याकडून, एका सरल वृक्षास कापून त्याच्या चिरफटींत खिळून टाकिलें. या कचाटींत तूं दुःख भोगीत बारा वर्षे रखडत

दुःखाचे सुस्कारे टाकीत ना राहिलास! त्या दिवसापासून ती ज्या घोरपडीसारख्या आंगांच्या भुतास येथें व्याली त्याशिवाय मनुष्यस्वरूपधारी जिवाचें वारें देखील या बेटांत नव्हतें.

**एरियल**—हो; तो तिचा मुलगा क्यालिबिन?

**प्रोस्पेरो**—होय, तो बेटा मृत्पिंड क्यालिबन, जो आतां माझ्या किंकरांत चाकरीस आहे. मी जेव्हां या बेटांत आलों तेव्हां मीं जें तुला कष्ट भोगतांना पाहिले ते तूं जाणतोसच. तुझे सुस्कारे ऐकून लांडगे देखील किंकाळ्या फोडीत. आणि सदोदीत रुष्टस्वभाव जीं अस्वलें त्यांच्याही अंतःकरणाचा भेद करीत. त्या डाकिणीस भुतांवर हा मंत्र घालतां मात्र येत होता. परंतु त्याचा उतारा करून तो फिरविण्याची शक्ति तिजमध्यें नव्हती. मग येथें जेव्हां मी आलों आणि तुझा आक्रोश ऐकिला, तेव्हां मींच माझ्या मंत्रसामर्थ्यानें त्या सरळ वृक्षास भंगवून तुझी सुटका केली.

**एरियल**—महाराज, याबद्दल मी आपले उपकारच मानितों.

**प्रोस्पेरो**—खबरदार तर; जर आजपासून अशी कुरकुर केलीस तर, आतां एक मोठें चिंचेचें झाड फाडून त्याच्या कठिण तंतूंमध्यें खुंटीप्रमाणें पुन्हां बारा वर्षें आरडत बसशील असा तुला खिळून टाकीन—समजलास.

**एरियल**—नका नका क्षमा करा, महाराज. आजपासून आपल्या हुकुमाप्रमाणें नीट वागेन; आणि ज्या भूतचेष्टा करण्यास सांगाल त्या आपला निमुटपणें करीन.

**प्रास्पेरो**—कर तर तसें. आणि आजपासून दोन दिवसांनीं तुझी सुटका करीन.

**एरिएल**—वहावा! याचें नांव मेहेरबानी. अहो, माझे सरदार, आतां मीं काय करावें तें सांगा. सांगा सांगा लवकर.

**प्रास्पेरो**—जा, आणि एका सागरदेवतेचें स्वरूप घे; आणि एक माझ्या व तुझ्या खेरीज कोणाचे दृष्टीस तुझें स्वरूप न दिसें असें कर. दुसऱ्या कोणासही दृष्टीगोचर होऊं नकोस. जा, आणि तूं असा वेष धरून इकडे ये. नीट खबरदारीनें कर हो. [एरियल जातो.]

[मुलीस] हे माझ्या जीवप्राणा, ऊठ तूं आतां; जागी हो. तुझी झोंप आतां चांगली पुरी झाली. [मिरांदा उठते.]

**मिरांदा**—तुमची ती चमत्कारिक गोष्ट ऐकून मला सुस्तीनें गुंगी आली होती.

**प्रास्पेरो**—चल हो सावध आतां. आपला गुलाम क्यालिबन,—तो अभद्रा तर आपणांस सुधें उत्तर म्हणून कधींच देत नाहीं—चल त्याजकडे जाऊं.

**मिरांदा**—बाबा, तो मेला लुच्चा आहे. तो माझ्या दृष्टीसमोर देखील मला नाहीं आवडत मेला.

**प्रास्पेरो**—अगो, पण आपल्या सध्यांच्या स्थितींत त्यावांचून आपल्यास गति नाहीं. तो आपली चूल पेटवितो, लांकूडफाटें आणितो, आणि तशींच दुसरीं आपलीं फायद्याचीं कामें करितो. कायरे गुलामा, क्यालिबना अरे मृत्पिंडा, ओ देतोस का नाहींरे?

**क्यालिबन**—[आंतूनच] घरांत सरपण तर पुष्कळ आहे—उगीच वटवट.

**प्रोस्पेरो**—अरे, इकडे ये ह्मणतोंनी ? सरपण एक असलें ह्मणून ? तुला कांहीं दुसरें काम सांगायाचें आहे. अरे कासवा, आलास कीं नाहींरे ? [जलदेवतेचें सोंग घेऊन एरियल पुन्हां येतो त्यास] वा ! नामी सोंग ; चतुर एरियला, ऐक तुझे कानांत गोष्ट सांगतों.—

**एरियल**—ठिक महाराज, आतांच तें करितों तर. [जातो]

**प्रोस्पेरो**—अरे विषतुल्य गुलामा, अरे पिशाचगंडा, ये इकडे.

[क्यालिबन येतो.]

**क्यालिबन**—माझ्या आईनें डोमकावळ्याच्या पिसानें घाण दलदलींतून भुरदाड अशा जमा केलेल्या दवाप्रमाणें दुष्ट दवाची वृष्टि तुह्मा दोघांवर होवो. तुजवर नैर्ऋत्येकडील वारें जाऊन सर्व आंगावर नायटे उठोत.

**प्रोस्पेरो**—आज आपले पाठीस चांगलें तेल लावून ठेव. या द्वांडगाईबद्दल आज तुझ्या पाठीवर वळ उठवितों ; पार्श्वशूलानें जरा श्वास देखील घेतां येऊं नये असा तुला जखडून टाकितों ; सर्व रात्रभर तुझ्या आंगावर पाहिजेत ते व्यापार करावेत ह्मणून सर्व भूतांनां सोडून देतों ; मधपोळीस जशीं सर्वत्र छिद्रें असतात त्याप्रमाणें, ज्यापुढें मधमाशांचे दंश ह्मणजे कांहींच नाहींत असे बळकट चिमटे घेघेऊन तुझ्या सर्वांगाचें धिरडें करवितों; थांब.

**क्यालिबन**—काय मला जेवणबिवण देखील नको कां करायास ? हें बेट, जें तूं आतां बळकावून बसला आहेस तें, माझी आई सायकोराक्स इच्या नात्यानें माझें आहे. तूं जेव्हां येथें नवा आलास तेव्हां कसा चांगला माझे आंगावरून हात

द्यावेस आणि दिवसास जळणारा जो मोठा उजेड, व रात्रीस जळणारा जो लहान उजेड, त्यास काय ह्मणावें हें तूं मला शिकवावेंस; ह्मणून तूं मला आवडलास. आणि मीं तुला या बेटांतील सर्व प्रकार दाखवून दिले. गोड्या पाण्याचे झरे कोठें आहेत, मिठागरें कोठें आहेत, माळरान कोठें व पिकाची जमीन कोठें, हें चटसारें तुला दाखवून दिलें. जळोरे तो मी, ज्यानें तुला हें सर्व दाखवून दिलें! सायकोराक्सचे सर्व जादू, बेडुक, झुरळें, वटवाघळें सर्व तुझ्या आंगावर पडोत. या बेटांत तुझी प्रजा असे ह्मणण्यास काय तो मी एकटाच आहें. पण पूर्वी माझा मी आपला कसा राजा होतों. आतां तूं मजपासून सर्व बेट बळकावून घेऊन या अशा खडकामध्यें मला राहण्यास जागा दिली आहेस.

**प्रोस्पेरो.**—लुच्चा गुलामा, तूं माया करून कांहीं वळायाचा नाहींस; जेव्हां चांगले फरमाशी फटके उडवावेत तेव्हां वळणार. अरे नरकवत् ओंगळ जरी तूं आहेस, तरी मीं तुला माणसाप्रमाणें वागवून पाहिलें. माझ्या मठांत मीं तुला राहण्यास जागा दिली असतां तूं माझ्या मुलींची विटंबना करण्याचा इरादा केलास.

**क्यालिबन**—हं : हं : हं :! तें तसें झालें असतें तर काय बहार झाली असती! तूंच मध्यें आडकाठी आणिलीस; नाहीं तर हें बेट माझ्या चिल्यापिल्यांनीं भरून सोडिलें असतें.

**प्रोस्पेरो**—ओंगळ गुलामा! तुझ्या मनावर जेवढें ह्मणून वाईट तेवढ्याचाच ठसा उमटायाचा, चांगल्याचा म्हणून नाहींच. अरे, मीं तुजवर माया केली, तुला बोलायास

शिकविण्याचे श्रम घेतले, हरघडीं कांहींना कांहीं शिकविलें; अरे राक्षसा, पहिला तुझ्याच बोलण्याचा अर्थ तुला समजत नसून एकाद्या शुद्ध जनावराप्रमाणें बब् करीत होतास, त्या तुला, जें पाहिजे तें लोकांस समजवून देण्यास शब्द शिकविले; परंतु तुला शिकविलेलें जरी तूं कांहीं शिकला आहेस तरी तुझा स्वभाव असा दुष्ट आहे, कीं, सज्जनांस तुझा सहवास कधीं सहन होणार नाहीं, म्हणून मीं जें तुला या खडकांत अडकवून टाकिलें तें योग्य; तुला तर याहूनही खरतड एखादा तुरुंग पाहिजे.

**क्यालिबन**—तूं मला बोलायाला शिकविलेंस, त्यांत माझाही फायदा झाला आहे. आतां मला, तुला शिव्या कशा पोटभर देतां येतात. मला बोलायास शिकविलेंस, म्हणून तांबडी मरे आई तुला उलथोन टाको एकदाची!

**प्रोस्पेरो**—अरे भुताच्या पोरा, लंवड्याःनिघ येथून; आह्मांस सरपण आणण्याची जलदी कर; आणि दुसरें कांहीं काम करण्यास जलदी इकडे आलास तर बरें–काय मादरचोदा, आंग चोरतोस? जर सांगितलेलें काम करण्याचें राहिलें, किंवा रडत रडत केलेंस, तर सर्व पाठीवर जबरदस्त वळ उठवून तुझी चांदीच करीन, आणि हाडें अशीं मऊ करीन कीं तुझ्या दुःखाच्या आरडण्यानें अरण्यांतील जनावरें देखील कांपू लागतील.

**क्यालिबन**—नकोरे बाबा! पायां पडतों, [आपल्याशीं] एकलेंच पाहिजे याचें. याचा इल्म असा जबरदस्त आहे कीं त्याच्या माराखालीं माझ्या म्हातारीचा देव महावेताळ "सितेबास", तो देखील वठणीस येऊन याची गुलामगिरी करील.

**प्रोस्पेरो**—ठीक आहे, गुलामा, जा तर येथून [ क्या० जातो ] [गाणें गात व वाजवीत अदृश्यरूप धारण केलेला एरियल पुन्हा येतो; त्याचे मागून फर्दिनांद येतो. ]

एरियलचें गाणें.

**दिंडी.**

॥ येइयेई या हैमवालुकेंत ॥
॥ अनंतर तो घा ग्रहण करी हस्त ॥
॥ आदरानें त्यां अधर चुंबितां कीं ॥
॥ जाण शमिला कल्लोळ सागरें कीं ॥ १ ॥
॥ पावलांतें घा जपुन ठेवुनीया ॥
॥ हळू चाले एथून सख्या राया ॥
॥ पिशाच्चांनो गा ध्रुपद सुरावरी ॥
॥ तान घेऊनि बहुगोड गळ्यावरी ॥ २ ॥
ध्रुपद ॥ ऐका ऐका हो श्वान भुभू करी ॥ छ ॥
॥ ऐका ऐका कुक्कुट कुकू करी ॥ छ ॥

**फर्दिनांद**—हें गायन कोठें चाललें असावें? हें काय आकाशांत म्हणावें कां भूमीवर! पण आतां तें थांबलें. खरोखर असें वाटतें कीं या बेटाच्या कोण्या देवतेपुढचें हें गाणें असावें. किनाऱ्यावर बसून आमचे बाबा बुडाले त्यांचा मी पुन्हा शोक करीत होतों, तेव्हां पाण्यावरून हा नाद माझे कानीं पडतांच, त्याच्या रागदारीच्या माधुर्यानें माझे दुःखाची शांति झाली; आणि तसाच पण समुद्रक्षोभही बंद झाला. मी त्या नादाच्याच सुगावा घेत त्यामागें आलों; किंवा त्या नादानेंच मला आकर्षिलें असें ह्मटलें पाहिजे.—पण तें गाणें तर आतां संपलें! अरे, नाहीं, ही पहा पुन्हा सुरुवात झाली. [एरियल पुन्हा गाणें गातो.]

## ॥ एरियलचें गाणें ॥

॥ पद ॥ (लावणीच्या चालीवर).

॥ तुझ्या पित्याच्या प्रेतविधीच्या घंटारे वाजती ॥
॥ ऐक त्या किण किण करिताती ॥ ध्रु ॥
॥ तुझा पिता पाण्यांत बुडाला पांच पुरुष बहु खोल ॥
॥ त्याचिं हडें विद्रुम बनलीं मोल ॥
॥ गर्भ शरीरीं आहे, सकल तें सलिलें हो बहु थोर ॥
॥ मोलवान आणि सुंदर ॥
॥ त्याच्या नयनाचे बा मौक्तिक सुंदर अति बनती ॥
॥ सर्व अवयवें अशिंच बदलती ॥ २ ॥
तुझ्या पित्याच्या ॥ ध्रु ॥ १ ॥

**फर्दिनांद**—ह्या टप्यांत माझ्या बुडून मेलेल्या बापाची आठवण काढलेली आहे, त्या अर्थीं हा गायन व्यवसाय अमानुष होय. असे सुंदर राग या जगांतील कोठचे? मला ही ते आकाशांतूनच ऐकू आले.

**प्रोस्पेरो**—मुली नीट, पापण्या वर करून पहा, आणि सांग तें दूर तुला काय दिसत आहे?

**मिरांदा**—काय हो तें बाबा? काय एकादें पिशाच! देवा! कसें तरी तें गोजिरवाणें टकमक पाहत आहे! खरेंच सांगतें, बाबा; याचें स्वरूप तर मोठें शानदार आहे. खचित पण हें भूतच.

**प्रोस्पेरो**—छिः पोरी, अगे, तें खातें, निजतें; आणि आपल्याला जशीं इंद्रियें आहेत, तशीं त्यास ही आहेत; हुबेहुब तशींच. हा जो तरणा ताठा बांड तूं पाहात आहेस हा त्या बुडालेल्या जहाजांतील एक मनुष्य आहे. सौंदर्यविध्वंसक जें दुःख त्याणें हा थोडासा फिका पडला आहे; नाहीं तर हा मोठा सुंदर ह्मणण्यासारखा आहे. त्याचे सोबती

गमावले आहेत त्यांस शोधून काढावें ह्मणून तो भटकत आहे.

**मिरांदा**—मला वाटतें याला स्वर्गांतील प्राणी ह्मणावें; कारण या सृष्टींत जे मीं पदार्थ पाहिले त्यांत असा सुंदर एकही नाहीं पाहिला.

**प्रोस्पेरो**—[मनांत] माझ्या इच्छेनुरूप चाललें आहे, हें सर्व ठीक आहे. हे चतुर एरियला, आतां दोन दिवसांत तुझी मुक्तता करितों.

**फर्दिनांद**—निःसंशय मघाचीं गाण्यीं ज्या देवतेपुढें गाईलीं ती देवताच ही खरी. हे देवी! कृपा करून माझी प्रार्थना ऐकावी, आणि आपलें वास्तव्य या बेटांतच आहे कीं काय हें कृपाकरून मला सांगावें; व या बेटांत मीं आतां कसें काय वर्तावें याविषयीं कांहीं सदुपदेश करावा; परंतु माझा जो मुख्य अर्ज तो हा आतां शेवटीं मी करितों—हे नवल सुंदरी! तूं कोणी मनुष्यकन्यका आहेस, किंवा खरोखर कोणी देवताच आहेस हें सांगून माझी संशयनिवृत्ति करावी.

**मिरांदा**—नवल कसचें; महाराज मी खचित एक मुलगी आहे.

**फर्दिनांद**—ही तर आमचे देशाची भाषा बोलले! ज्या देशची भाषा मी बोलतों त्या देशांतील मी सर्वोत्तम आहें, पण या वेळेस त्या देशांत असतों तर ठीक होतें!

**प्रोस्पेरो**—काय! तूंहीच सर्वोत्तम! हें कसें होईल? जर नेपल्सच्या राजानें तुला असें बोलतांना ऐकिलें तर तुझी दशा कशी होईल?

**फर्दिनांद**—मी जरी आतां बापुडवाणा होत्सातां तुझे बोलण्याचा चमत्कार करीत एकटाच येथें उभा आहें, तरी

[ या वेळेस खरोखरच नेपल्सचा राजाच मी जें काय ह्मणतों तें हा ऐकतोच आहे. आणि मी रडतों तें एवढ्यासाठीं-च. नेपल्सच्या गादीचा मालक आतां मीच आहें, कारण या माझ्या डोळ्यांनीं मीं माझा बाप बुडून मरतांना पाहिला. तेव्हांपासून हा अश्रुप्रवाह बंद झालाच नाहीं. ]

**मिरांदा**—अरेरे कोण दुःख हें!

**फर्दिनांद**—खरोखर राजा बुडाला, त्याचे मानकरी बु-डाले, मिलन येथील ड्यूक व त्याचा सुंदर मुलगा तेही पण दोघे बुडाले!

**प्रोस्पेरो**—[मनांत] मिलन येथील ड्यूक आणि त्याची सुंदर मुलगी तर हीं येथेंच आहेत. पाहिजे असल्यास तुला खोटा असा ते आतांच ठरवितील. परंतु इतक्यांत तसें करणें योग्य नाहीं!—वा! सकृत् दर्शनींच उभयतांचे डोळ्याचे चाळे! शाबास एरियल! या कामगिरी बद्दल मी तुझी सुटका क-रीन—पण अहो भले गृहस्थहो, तुह्मी कांहीं खाणखूण सांगा. तुह्मी भलताच बाहाणा करीत आहांत. सांगा तर खाणखूण जलद.

**मिरांदा**—असें आमचे बाबा यावर रागावतात काय ह्मणून! [ या बेटांत आल्या पासून आह्मा दोघांखेरीज काय तें तिसरें हें माणूस दृष्टीस पडत आहे. आणि यास प्रथम पहा-तांच माझें चित्त आर्द्र होऊन याजकरितां शीण पावत आहे. कसें तरी होऊन बाबांचें चित्त माझे प्रमाणेंच वळो! ]

**फर्दिनांद**—अगे, जर तूं अजून कुमारिका असलीस, आणि तुझें चित्त कोणावर जडलें नसेल, तर मी तुझ्याशीं लग्न लावन तुला नेपल्सच्या गादीची पट्टराणी करीन.

**प्रोस्पेरो**—अहो जीभ आटपा, एक शब्द जास्ती बो-

ललां तर संभाळा. [मनांत] एकमेकास हीं दोघें अगदीं वश झालीं आहेत, परंतु हा त्वरित व्यवसाय उपयोगाचा नाहीं; कारण जें अनायासें प्राप्त झालें त्याची कांहीं अपरूपाई वाटत नाहीं. ह्मणून मी आतां मध्यंतरीं नसत्या अडचणी उत्पन्न करितों. [फर्दिनांदास] अरे मी सांगतों इकडे लक्ष दे, एक शब्द देखील येथें काढूं नकोस. तूं लटकाच मी नेपल्सचा राजा आहें असा बाहणा करितोस. पण तूं चोरटा जासूद आहेस. आणि या बेटाचा मालक जो मी त्या मजपासून हें बेट जावें असें संधान करण्यास येथें आला आहेस.

फर्दिनांद—मी आपल्या गळ्याची शपथ वाहून सांगतों कीं मी चोरटा जासूद नाहीं.

मिरांदा—[अशा सुंदर मंदिरांत पापाची वस्ती होणें नाहीं. जर पापी प्राण्यांस असें सुंदर शरीर प्राप्त होत असेल तर सज्जन देखील त्यांत राहण्याकरितां उड्या टाकतील.

प्रास्पेरो—[फर्दिनांदास] याहो तुम्ही असे आमच्या मागून. पोरी, त्याचा पक्ष घेऊन तुला कांहीं बोलण्याची गरज नाहीं. हा लुच्चा राजद्रोही आहे. येरे, तुझ्या हातापायांत बिड्या घालून या गळ्यांत अडकवितों. [समुद्राच्या खाऱ्या पाण्याशिवाय तुला पिण्यास कांहीं मिळायाचें नाहीं. आणि भिकार ओढ्यांतील कालवे, वाळलेल्या मुळ्या, आणि ज्यां फोलामध्यें धान्य वाळून शुष्क होऊन डुलडुल हलतें त्या फोलाशिवाय दुसरें कांहीं खाण्यास मिळणार नाहीं. चल, ये.

फर्दिनांद—असलें भोजन मी कधीं नाहीं खाणार. जो कोणी हें खाऊं घालणार त्याची काय शक्ति आहे, ती तर अधीं पाहूं. [तरवार उपसतो परंतु प्रास्पेरो त्यास मंत्रसामर्थ्यानें तेथच्या तेथेंच खिळून टाकितो.]

**मिरांदा**—अहो बाबा! त्याच्याशीं असें एकाएकीं निकरावर येऊं नका. कारण तो सभ्य असून शूरही आहे.

**प्रोस्पेरो**—कां पोरी, फार लवलव मांडली आहेस? काय पहा आजास नातू शिकवी म्हणतात तसें!—अरे लुच्चा, तूं आपली तरवार म्यानांत घाल. मारण्याचा आव तर मोठा घालतोस, पण हात करण्याची हिम्मत कोठें आहे? तुझेंच मन तुला खातें आहे. चला, आपला मोहरा सोडा, आणि या असें; नाहीं तर या एका काठीनें तुला निःशस्त्र करून तुझें हत्यार जमिनीवर पाडण्याची करामत माझे आंगीं आहे.

**मिरांदा**—बाबा, मी तुमच्या पाया पडतें? असें करूं नका.

**प्रोस्पेरो**—चल हो पलिकडे, अशी आंगरख्याला कां झोंबतेस?

**मिरांदा**—बाबा! त्याच्यावर दया करा. हवें असल्यास मी त्याला जामीन होतें.

**प्रोस्पेरो**—चप बैस. एक शब्द जर आतां जास्ती बोललीस तर तुझ्यावर तोंड सोडीन इतकेंच नाहीं, पण तुझा त्रास देखील करीन. तुला असल्या सोद्याचा कैवार कां? चप बैस. तुला वाटतें कायतो रूपवान हाच. [तुझ्या दृष्टीस कायतो आमचा मृत्पिंड पडलेला, आणि आज कायती ही मूर्ति पाहिली. वेडी बेटी पोर! अगे बहुतेक माणसें अशीं सुंदर आहेत, कीं त्यांपुढें हा म्हटला म्हणजे जसा देवदूतांपुढें आपला क्यालिबन.....]

**मिरांदा**—असें जरी खरें असलें तरी चिंता नाहीं; माझे प्रीतीची धांव कांहीं फार लांब नाहीं.

**प्रोस्पेरो**—चलरे, ऐकतोस ना! तुझ्या आंगांत आतां कांहीं पाणी राहिलें नाहीं. तुझ्या स्नायूंची सर्व रग जाऊन

केवळ अतिबाल्यावस्था पुन्हा प्राप्त झाल्याप्रमाणें तूं दुर्बल होऊन गेला आहेस.

फर्दिनांद—असें झालें आहे तर खरें, माझी सर्व हिम्मत केव्हांच स्वप्नांतल्याप्रमाणें नाहींशी झाली. माझ्या बापाचें मरण, ही आंगीं आलेली अशक्तता, आमच्या सर्व इष्टमित्रांचा अपमृत्यु आणि या जबरदस्त बोवांचें धमकावणें, हीं चट सारीं संकटें, जर माझ्या आतां प्राप्त होणाऱ्या कारागृहांतून ही कन्यका दिवसांतून एकवेळ पहाण्यास मिळेल, तर मी विसरून जाईन. ज्यांस स्वतंत्रता आहे, त्यांनीं पाहिजे तर सर्व पृथ्वीचा उपभोग घ्यावा. या माझ्या कारागृहांतच मी संतोष मानीन.

प्रोस्पेरो—[आपल्याशीं] मंत्राचा अम्मल चालला असत आतां. चतुर एरियला, तूं ठीक काम बजाविलेंस; इकडे ये, आणि आतां पुढें काय करायाचें तें तुझ्या कानांत सांगतों.

मिरांदा—बुवा, तुम्ही कांहीं फार दुःख करूं नका. आमचे बाबा रागानें बोलतात, पण त्यांचा स्वभाव कांहीं तसा नाहीं. आज जसे ते निष्ठुर झाले आहेत, तसे ते नेहमी नसतात.

प्रोस्पेरो—[एरियलास] थोडक्यांतच आतां तूं पर्वतावरील वाऱ्याप्रमाणें स्वतंत्र होशील. परंतु मीं सांगितलेलें मात्र जेथल्या तेथें कर हो.

एरियल—अक्षरशः सर्व करितों.

प्रोस्पेरो—अरे लुच्चा, चल तूं. तूं नकोगे त्याचे कडचें बोलूं.

[ सर्व जातात. ]

प्रथम अंक समाप्त.

## अंक २ प्रवेश १.

स्थल— बेटावरील दुसरा एक भाग.

[आलोंझो, सिबाश्चियन्, आन्तोनिओ, गोंझालो, एड्रियन्, फ्रान्सिस्को वगैरे येतात.]

**गोंझालो**— अन्नदाता, हुजुरापाशीं माझा अर्ज असा आहे कीं, सरकारांनीं या वेळेस दुःख करणें सोडून देऊन उलटा आनंद करावा. कारण सरकारांस काय आणि आह्मांस काय, आज ईश्वरानें आनंद करण्यासारिखाच दिवस दाखविला ह्मणायाचा. एकपक्षीं आमचें नुकसान झालें हें तर खरेंच; परंतु हुजूर सुरक्षित, हे इतके सारे सुरक्षित, ही काय थोडी खैर ह्मणायाची? अहो, जो प्रसंग ईश्वरेच्छेनें आज आह्मावर गुजरला आहे तो तर या मृत्युलोकीं सर्वांच्या मागें लागलेलाच आहे. आजकाय ऐकावें तर, कोण्या अनाथ स्त्रियेचा पति समुद्रांत बुडून मेला; उद्यां काय, कोणी सौदागराचे जहाजावरील तांडेल मेला, कोणी सौदागर मेला; याप्रमाणें नित्य कांहीं ना कांहीं घडून येतच आहे. परंतु आज ज्या अद्भुत चमत्कारानें आह्मी हे सर्व वांचलों, असला चमत्कार कोणाच्या कानीं तरी आला असेल काय? ह्मणून मी ह्मणतों, महाराज, विवेक करावा, सुखदुःख तोलून सुखातिशयाचा आनंद मानावा.

**आलोंझो**— अरे बाबा, पुरे ही तुझी कटकट.

**सिबाश्चियन**—[ज्याप्रमाणें एखाद्यास थंड घाटा आणून पिण्यास दिल्यास आनंद होत नाहीं, त्याप्रमाणें सांत्वनापासून त्यांना आनंद होत नाहीं.]

**आन्तोनिओ**—पण हे महात्मे आपल्या शांतवनाची पराकाष्ठा केल्याशिवाय त्यांस चैन पडूं नाहीं देणार.

**सिबाश्चियन**—पाहा ते घोटाळून घोटाळून आपल्या बुद्धिरूप घड्याळास जशी काय किलीच देताहेत. आतां पहा, घड्याळ चालूं होऊन ठोके पडूं लागतील.

**गोंझालो**—अन्नदाता,—

**सिबाश्चियन**—एक; हणा पुढचा ठोका पाहूं.

**गोंझालो**—जें जें दुःख येईल त्याचें त्याचें प्रस्थच माजविल्यास अशा दुःखरंजन करणाऱ्याच्या हतीं काय लागतें!

**सिबाश्चियन**—करवंटी.

**गोंझालो**—खरेंच त्याच्या हातीं दुःखरूप करवंटीच लागून तो केवळ दुःखांत बुडतो. आपण गेलात चेष्टा करायाला, पण तोंडांतून जें निघालें तेंच खरें.

**सिबाश्चियन**—आपण समजणारे तारे पडलांतना? मी काय बोललों आणि आपण काय समजलां?

**गोंझालो**—ह्मणून महाराज,—

**आन्तोनिओ**—छी! छी! कायहो तरी हा लघळ माणूस!

**ओलोंझो**—अरे बाबा, मी पायां पडतों, सोड आतां माझी पाठ.

**गोंझालो**—ठीक आहे तर; आटपलेंच मीं माझें बोलणें. पण एवढें—

**सिबाश्चियन**—"एवढें तेवढें" ह्मणून त्याचें चालायाचेंच आपलें घोडें.

**आन्तोनिओ**—अरे पाहूं या पैज घालून कीं, एड्रियन आणि गोंझालो या दोघा कोंबड्यांतून पहिल्यान्दा "कुक" कोणता करितो.

**सिबाश्चियन**—खास पहिल्यानें हा वृद्ध कोंबडाच बोलेल.

**आन्तोनिओ**—छे; पहिल्यानदां हा छोटा कोंबडाच बोलेल.

**सिबाश्चियन**—ठीक आहे. पैज लावा तर कशाची लावता ?

**आन्तोनिओ**—हांसण्याची.

**सिबाश्चियन**—जोड तर खाशी जमली आहे बुवा.

**एड्रियन**—जरी हें बेट असें निर्जन दिसत आहे,—

**सिबाश्चियन**—हः हः हः हें घ्या आपलें बक्षीस!

**एड्रियन**—जरी हें बेट मनुष्याच्या वस्तीस अयोग्य व संचार करण्यास दुर्घट दिसतें,—

**सिबाश्चियन**—"तरी;"— हें चालूं द्या.

**एड्रियन**—तरी,—

**आन्तोनिओ**—वाक्य पुरें झाल्याशिवाय नाहीं राहयाचें.

**एड्रियन**—तरी येथील हवा चंचल, गुलजार, व सुखदायिनी असली पाहिजे.

**आन्तोनिओ**—आपली रांड गुलजार ती तरी मोठी सुखदायिनीच होती.

**सिबाश्चियन**—हो, आणि जसें या विद्वानांनीं सांगितलें त्याप्रमाणेंच पण चंचल ही.

**एड्रियन**—हे हवेचे गुस्कार कसे सुखदायक आपल्यावर पडत आहेत!

**सिबाश्चियन**—जसें कांहीं त्या बयाचीं आंतडीं कुजूनच गेलीं आहेत.

**आन्तोनिओ**—किंवा जसें कांहीं मुरदाड डपक्याचा सुगंधच तीस सुटला आहे.

**गोंझालो**—संसारांत ज्याचा ज्याचा ह्मणून उपयोग, तें सर्व या बेटांत आहे.

**आन्तोनिओ**—खचीत, प्राणरक्षणाच्या उपायाखेरीज करून सर्व कांहीं.

**सिबाश्चियन**—तेवढ्याचें मात्र नांव घेऊं नका.

**गोंझालो**—हें गवत पहा कसें उफाड्याचें आणि सतेज दिसतें, व कसें हिरवें चार आहे!

**आन्तोनिओ**—आणि ही माती,–ही कां पहाना! ही तरी ह्मणता कशी तांबडी लाल आहे.

**सिबाश्चियन**—आणि दिसण्यांत देखील शृंगाररहित कशी साळी भोळी!

**आन्तोनिओ**—गोंझालो कांहीं फारसा चुकत नाहीं.

**सिबाश्चियन**—छे हो, तो कोठला चुकायाला. एक समूळ सत्य मात्र खेरीज करा.

**गोंझालो**—पण या सर्वांहून हा मोठा चमत्कार आहे कीं,–कोणास सांगितलें तर खरें देखील वाटणार नाहीं.—

**सिबाश्चियन**—बहुतेक खरें खरें ह्मणून सांगितलेले चमत्कार जसे असावयाचे तसाच हा एक.

**गोंझालो**—अहो पण हे आपल्या आंगावरचे कपडे, हे समुद्राच्या पाण्यांत भिजले असतांही जसेच्या तसेच झकाकत आहेत; इतकेंच नाहीं, पण समुद्राच्या पाण्यानें खराब होण्याचे राहून जसे नवे रंगवून काढिले आहेत असे दिसतात!

**आन्तोनिओ**—जर याचे एखाद्या खिशास वाचा असती तर, त्यानें यास सोदा ह्मणून ह्मटलें नसतें काय ?

**सिबाश्चियन**—खिशानें असें जर ह्मटलें नसतें तर त्यानें हीं सत्य खिशातच घालून ठेविलें असतें ह्मणायचें.

तसेच झगझगीत दिसत आहेत.

**सिबास्चियन**—तें लग्न मोठ्या चांगल्या मुहूर्तावर लागलें ह्मणूनच आह्मी घरास असे सुखानें पोंचलों!

**एड्रियन**—ट्यूनिस शहरास अशी लावण्यराशी राणी मिळून अशी शोभा कधींच आली नसेल.

**गोंझालो**—खचित गंगाभागीरथी मातोश्री डायाडोबाईसाहेबापासून तर आजपावेतों असें रत्न तेथें दुसरें नाहीं पडलें.

**आन्तोनिओ**—गंगाभागीरथी! कोणरे हा शब्द! अरे हा शब्द मध्यें कशास घातला! काय डायाडोराणी बोडकी होती?

**सिबास्चियन**—अहो, ईनियस याची एक बायको मेली होती, ह्मणून त्यास विधुर जसें ह्मणतां येईल, तसें डायाडोच्या प्रथम संबंधाचें झालें होतें. हें लक्षांत आणा ह्मणजे झालें. उगीच भलताच अर्थ काय काढिता भले महाराज!

**एड्रियन**—काय तुह्मी डायाडो बोडकी विषयीं ह्मणता आहां? तुमच्या बोलण्याचा मला मोठा चमत्कार वाटतो. ती तर कार्थेजची राणी, ट्यूनिसशीं हा काय तिचा संबंध!

**गोंझालो**—अहो महाराज, ट्यूनिस तेंच कार्थेज बरें.

**एड्रियन**—काय कार्थेज आणि ट्यूनिस एकच!

**गोंझालो**—मी तुह्माला खचित सांगतो एकच.

**आन्तोनिओ**—अहो, गोंझालोच्या तोंडांतून शब्द निघाले ह्मणजे त्यांचा प्रभाव काय पुसावा! आल्फियन राजाच्या भारलेल्या सारंगींतील मंत्राक्षरांपेक्षांही तो बलवत्तर.

**सिबाश्चियन**—आल्फियन राजानें काय नुसता आपल्या शहराचा तटच मंत्रानें उभा केला, परंतु यानें तर आपले शब्दानें कार्थेज यास ट्यूनिस बनवून त्या नाश केलेल्या तटबंद शहराचे घरांदारांसुद्धां पुनरुज्जीवन केलें!

**आन्तोनिओ**—आतां दुसऱ्यानदां हे महाराज असेंच दुसरें कोणतें अघटित कर्म अशाच सुलभ रीतीनें करणार कोण जाणें!

**सिबाश्चियन**—मला वाटतें हें बेट आतां आपल्या खिशांत घेऊन जाऊन हे आपले मुलास खेळण्यास सिताफळ ह्मणून देतील.

**आन्तोनिओ**—आणि समुद्रांत त्याचा गीर पेरून पुन्हां पुष्कळ बेटांचा मळाचामळाच उठवून देतील.

**आलोंझो**—हाय! हाय!

**आन्तोनिओ**—आस्ते आस्ते हे सर्व चमत्कार करतील.

**गोंझालो**—महाराज आपल्या छोट्या बाईसाहेब–आतां तर त्या ट्यूनिस येथील राणीसाहेब झाल्या–त्यांचे लग्नाच्या वेळेस जसे हे आंगरखे झगझगीत दिसत होते तसेच आतां दिसत आहेत, असे आह्मी बोलत होतों.

**आन्तोनिओ**—आणि आह्मी असेंही बोलत होतों कीं, असल्या रत्नाचा लाभ त्या गादीस पूर्वी कधींच झाला नाहीं.

**सिबाश्चियन**—अरे, मेहरबानी करून त्या डायाडो बोडकीचें नांव तेवढें तरी वर्जा.

**आन्तोनिओ**—ती डायाडो बोडकी ती खरी.

**गोंझालो**—ही माझी बंडी मीं पहिले दिवशीं घातल्याप्रणेंच उजळ नाहीं काय महाराज! कांहीं अंशीं तशीच नाहीं काय; असा माझ्या बोलण्यांतील भाव.

गांझालो—आपले मुलीचे लग्नांत मी जशी घातली होती तशीच ही नाहीं का महाराज?

आलोंझो—आपली मुलगी, आपली मुलगी, असें ह्मणून ज्या गोष्टीचा शिरकाव माझे मनांत होत नव्हता तो तेथें तुह्मीं बळेंच केलात. मीं तेथें आपली मुलगी दिली नसती तरी बरें झालें असतें; कारण तेथून परत येतांना आमचा मुलगा गमावला, आणि आमचा इतली देश कोठें, आणि ट्यूनिस कोठें!--मला वाटतें कीं, पोरीची व माझी भेट ही पुन्हा होणें नाहीं. हाय! हाय! रे माझ्या नेपल्स आणि मिलनच्या गादीच्या मालका, माझे पुत्रा, कोण्या रे विजातीय माशानें तूस खाऊन आपलें यथेष्ट भोजन केलें!

फ्रान्सिस्को—महाराज, राजपुत्र जिवंत असावा. मीं त्यास समुद्राच्या लाटा आपल्या पायांखालीं लथडीत, वर घोड्याप्रमाणें त्यांच्या पाठीवर बसून जातांना पाहिलें. पाण्याचें सर्व भय सोडून त्यानें पाण्यास लथडावें, आणि मोठी लाट जी त्यासमोर येई, तीस छाती भिडवुन त्यानें वर तरंगावें. तो आपलें डोकें त्या लाटांच्या भडिमारावर धरून मोठ्या झपाट्यानें वल्ह्याप्रमाणें हात टाकून किनाऱ्यास गेला, त्या वेळेस असा चमत्कार झाला कीं, पाण्यापासून उंचावर जी जमीन होती तिनें त्या राजपुत्रास झटकर संकटांतून सोडविण्यास शिर नमविलें. मला तर तो जिवंतपणें जमिनीस लागल्याचा कांहीं संशय नाहीं.

आलोंझो—आतां तो जिवंत कोठचा! तो गेलाच.

सिबास्टियन—महाराज आपलें कन्यारत्न युरोपांतील

पडल्यामुळें आपल्या डोळ्याचें पाणी न खळण्यास दुसरें कारण झालें. हे सर्व उपकार आपले आपणच करून घेतले आहेत. येथें दुसऱ्यास शब्द लावण्यास जागा नाहीं.

**आलोंझो**—नकोरे, बाबा, असें बोलून आतां दुःखावर डाग देऊं.

**सिबाश्चियन**—अहो, आह्मीं सर्वांनीं तुह्मापुढें नाकें घासघासून असें करूं नका ह्मणून तुमच्या विनवण्या केल्या, आणि ती बिचारी सुंदर कन्या देखील आपले मनाची नाराजी व पित्राज्ञा यांमधून कोणत्याचें ग्रहण करावें, अशा घोटाळ्यांत पडली होती. आतां आपला मुलगा तर सर्वथैव गमावलाच असें आह्मांस वाटतें. आतां मिलन् संस्थानांत इतक्या स्त्रिया रांडावल्या आहेत कीं, त्यांचें शांतवन करूं ह्मटल्यास पुरतीं आपल्या जवळ माणसेंही राहिलीं नाहींत. या सर्व गोष्टींचा अपराध आपल्या माथ्यावर आहे महाराज.

**आलोंझो**—या संकटांतील मोठा बोजा मीं महापराधी ह्मणून उचललाच आहे.

**गोंझालो**—अहो सिबाश्चियन महाराज, तुह्मी जें बोलता तें सर्व खरेंच आहे; परंतु तुमच्या बोलण्यांत मार्दव नाहीं. ही दुःखावर डाग देण्याची वेळ नाहीं; मऊ मलम लावण्याचें टाकून तुह्मी जखम खाजवीतच बसता?

**सिबाश्चियन**—आपण तर बहुत मधुरच बोललांत.

**आन्तोनिओ**—आणि जसे कांहीं हे मोठे राजवैद्यच.

A4

B4

वाटतो.

**सिबाश्चियन**—वादळ ह्मणजे काय पुसता?

**आन्तोनिओ**—मोठें खराब वादळ नी!

**गोंझालो**—जर हें बेट आबाद करण्याचें माझ्याकडे असतें कीं नाहीं, महाराज, तर—

**आन्तोनिओ**—तर चहुंकडे काचकुहिऱ्याचें बीं फैलावून सोडिलें असतें.

**सिबाश्चियन**—नाहीं तर साबरी किंवा तरवट यांचें.

**गोंझालो**—आणि मी जर येथला राजा असतों तर ह्मणतां काय केलें असतें?

**सिबाश्चियन**—दुसरें काय! जवळ दारू नसल्यासच कदाचित् झिंगला नसतास.

**गोंझालो**—जर मी राजा असतों तर, या आमच्या सार्वजनिक सत्तात्मक राज्यांत चट सान्या चालू रीतीच्या उलट कहार मांडिला असता. मीं कोणताही ह्मणून व्यापार चालू दिला नसता. फौजदाराचें नांव देखील ठेविलें नसतें, कोणास ओनाम्याची देखील ओळख नलगे. गरीबी, श्रीमंती, आणि गुलामगिरी या सर्वांचा अभाव करून टाकिला असता; करारपत्रें, वारसपत्रें, जमिनीच्या हद्दी, जिराईत, बागाईत, मळे, चटसारे नाहींसे करून टाकिले असते. धातू, धान्य, दारू, तेल, यांची कांहीं एक गरज ठेविली नसती; ना कोणास कांहीं धंदा, ना परिश्रम. बायका व पुरुष सर्वांनीं स्वस्थ हात जोडून बसावें असें केलें असतें. पण सर्वांना शुद्ध नीतीनें मात्र वर्तविलें असतें. राजा बिजा कुच कांहीं नाहीं.

**सिबाश्चियन**—मूर्ख बेटा! आपणच प्रथम ह्मणत होता कीं "जर मी राजा असतों तर असें केलें असतें," आणि आतां ह्मणतो राजा बिजा कुच नाहीं.

**आन्तोनिओ**—याच्या राजनीतीच्या शेवटीं मुळाचें सर्व खंडन केलें आहे.

**गोंझालो**—सर्वांस ज्या ज्या गोष्टी पाहिजेत, त्या त्या धरित्रीनें कोणीं कांहीं एक श्रम किंवा खटपट केल्यांवांचून सर्वांस द्याव्यात असें केलें असतें,—राजद्रोह, महापराध, तरवार, खुरूपें, चाकू, बंदुका, यंत्र बिंत्र, यांतून एकाचीही गरज ठेविली नसती. आमच्या पवित्र प्रजेस सर्व धान्यादिकांची विपुलता आपोआप पृथ्वीपासून मिळावी असें करून ठाकिलें असतें.

**सिबाश्चियन**—पण लग्नें बिग्नें कांहीं आपल्या लोकांस करूं दिलीं असतींत, का तींही नाहींत?

**आन्तोनिओ**—छे हो! लग्नें कशास? सर्व रिकामट्या रांडा आणि लुचे यांचा बाजार माजवायाचा.

**गोंझालो**—मीं असें अगावीं उत्तम राज्य केलें असतें कीं, सत्य युगांतील राज्यें त्यापुढें काय माल.

**सिबाश्चियन**—या अशा महाप्रतापी गोंझालो महाराजावर ईश्वराची पूर्ण कृपा असो!

**आन्तोनिओ**—गोंझालो महाराज छत्रपती, चिरंजीव राहोत!

**गोंझालो**—आणिक, महाराज, इकडे तर पहा,—

**आलोंझो**—पुरे रे, बाबा, मी तुझ्या पायां पडतों. मजपुढें तूं केवळ अरण्यरोदन करीत आहेस.

**गोंझालो**—सरकार स्वारी ह्मणत्ये तें मीं पक्कें जाणूनच

वाऱ्याशीं देखील हांसणार, यांस कांहीं तरी हांसाया पुरतें कारण मिळावें.

**आन्तोनिओ**—आह्मी जे हांसलों, ते तुझ्या बोलण्यास हांसलों नाहीं; तुलाच प्रत्यक्ष हांसत होतों.

**गोंझालो**—मी कोठें आपलेप्रमाणें खुषमस्कऱ्या आहें, तर माझ्या बोलण्यास हांसाल? चालूंद्या आपलें अजूनही वाऱ्याशीं हासणें.

**आन्तोनिओ**—या उत्तरांत काय आमचा पाणउतारा झाला ह्मणता!

**सिबाश्चियन**—आपासून कोणाचा मर्मभेद झाला नाहीं एवढेंच मात्र कायतें.

**गोंझालो**—आपण मोठे शूर गृहस्थच पडलांतना; आपली काय गोष्ट! चंद्र जर पांच आठवडेपर्यंत नवा झाल्याशिवाय तसाच आपल्या मंडळांत वृद्धिंगत होत राहील तर त्यास देखील आपण एकीकडे फेकून देणार.

[अदृश्य रूप धारण करून एरियल येतो, आणि थाटदार गाणें चालतें].

**सिबाश्चियन**—हो, आह्मीं तसेंच करूं, आणि मग आंधारांत बिचकावून पांखरें धरण्यास जाऊं.

**आन्तोनिओ**—पण भले महाराज, तुह्मी रागावूं नका हो.

**गोंझालो**—छे हो, मी कांहीं अशा हलक्या सलक्यानें चिरडीस जाणारा नाहीं हें तुह्मांस लिहून देतों, पण मी झोंपीं जाईपर्यंत अशीच कांहीं हांसून गम्मत कराल तर ठीक; कारण मी आतां केवळ गुंगून गेलों आहें.

**आन्तोनिओ**—जा नीज तर, आणि आम्ही कसे हांसतों तें ऐक.

[आलोन्झो, आन्तोनियो, आणि सिबाश्चियन यांखेरीज सर्व झोंपीं जातात.]

**आलोंझो**—काय एवढ्यांतच हे सारे झोंपीं गेले? माझे-ही डोळे मिटूं पाहात आहेत. त्यांच्या बंद होण्यासरसे माझे मनांतील विचारही बंद होतील तर बरें.

**सिबाश्चियन**—महाराज, आपण कृपा करून या निद्रेच्या आलस्ययुक्त देणगीचा आंगीकार करावाच. दुःखी प्राण्यास क्वचितच् हा लाभ होतो; परंतु जेव्हां हा होतो, तेव्हां तो सुखासच कारण होतो.

**आन्तोनिओ**—महाराज, आपली निद्रा होई तोंपर्यंत आम्ही दोघे आपल्याजवळ आपल्या शरीरसंरक्षणाकरितां उभे राहून पहारा देतों.

**आलोंझो**—मी तुमचा आभारी आहें.—काय विलक्षण आंग मोडून आलें हें! [आलोंझो निजतो, एरियल जातो.]

**सिबाश्चियन**—कायहो विलक्षण गुंगी यांस आली आहे!

**आन्तोनिओ**—हा या हवेचा गुण वाटतो.

**सिबाश्चियन**—तर मग आमचे डोळे कां मिटत नाहींत! आपणांस तर बुवा झोंप घेण्याची इच्छाही नाहीं.

**आन्तोनिओ**—आपणांसही नाहीं बुवा. माझा स्वभाव पडला खटपटी. पण कायहो, जसा कांहीं एक संकेत करावा, त्याप्रमाणेंच हे सर्व एकदम पसरले,—आकाशाची कुऱ्हाड पडावी त्याप्रमाणें हे सर्व भुईवर पडले आहेत! हे भाग्यशाली सिबाश्चियना, या वेळेस तुझें तर काय, तुला केवढा लाभ! पण आपण कशास बोलावें तें? खरेंच पण मला वाटतें तुझ्या

योग्य कोणती पदवी आहे हें तुझे मुखश्रीवरूनच हा प्रसंग सुचवितो. माझ्या दारुण मनोदेवतेस तुझ्या डोक्यावर जणु राजमुकुट उतरतच आहे असें दिसतें!

**सिबाश्चियन**—काय तूं जागा तर आहेस ना!

**आन्तोनिओ**—मी धडधडीत जागा बोलत आहें तें तुम्हास ऐकूं नाहीं का येत?

**सिबाश्चियन**—होय, मला ऐकूं येतें, पण हें बरळणें आहे; आणि तूं झोंपेमध्यें बडबडतो आहेस, असें खचित वाटतें. तूं काय बोललास! ही तर बुवा चमत्कारिक झोंप, कीं झोंपी तर जावें, आणि डोळे तर फटफटीत उघडे! तुला अशी चांगली गाढ निद्रा लागली असतां तूं चांगला उभा राहतोस, बोलतोस, आणि हात पाय हलवितोस!

**आन्तोनिओ**—उदार सिबाश्चियना, तूंच रे आपले दैवास झोंप घेण्यास लावितो आहेस, नशिबास तूंचरे मारून टाकितो आहेस असेंही म्हणण्यास हरकत नाहीं. तूंच जागा असतां निजल्या सारखा.

**सिबाश्चियन**—तुझ्या बरळण्यांत एकून उघड कांहीं मतलब दिसतो.

**आन्तोनिओ**—मी नेहमीप्रमाणें कांहीं थट्टा करीत नाहीं. जर माझें ऐकणें असेल तर तुलाही गंभीर झालें पाहिजे. माझें जर ऐकशील तर तूं आहेस याहून तिप्पट मोठा होशील.

**सिबाश्चियन**—बोल तर. हा पहा मीं संत पाण्यासारिखा स्तब्ध उभा राहिलों ऐकण्यास.

**आन्तोनिओ**—तर मग मी आतां तुला कसें चंचल होऊन उतास यावें तें शिकवितों.

**सिबाश्चियन**—शिकीव तर. आमचे घराण्यांतील आळसानें खालीं दबून राहण्याचें तर आम्हांस शिकविलेलेंच आहे.

**आन्तोनिओ**—अरे ज्या गोष्टीची तूं अशी हेळणा करीत आहेस, ती गोष्ट तुझ्या एकदां नीट ध्यानीं आल्यावर तूंच ती बजाविण्याविषयीं प्रार्थना करूं लागशील. याप्रमाणें तूं तिचें वस्त्रहरण करितांना तिजवर वस्त्रें ज्यास्तीच घालितोस. आंत आंत दबणारे जे मनुष्य आहेत, ते आपल्या आळसानें व भीतीनें केव्हां केव्हां तळाचीच पण गांठ घेतात.

**सिबाश्चियन**—तुला माझी अशी विनंती आहे कीं, तूं पुढें बोल. तुझें डोळे वठारणें, आणि गोरें मोरें तोंड, यांवरून तुझे मनांत कांहीं अघटित कल्पनेचा संभव झाला आहे; व त्या योगें प्रसुतिवेदनेप्रमाणें तूं शिणत आहेस, तर पोटांतील गोष्ट पडूंदे एकदां उघडपणें बाहेर.

**आन्तोनिओ**—महाराज, माझें म्हणणें असें आहे.—हा मंदमति मानकरी असा बुद्धिशून्य आहे कीं, मला वाटतें हा जरी मेला तरी याजबद्दल लोक फारसे हळहळणार नाहींत. यानें येथें केवळ साखरच पेरिली. बुवा, मूर्तिमंत गोडबोलेच. जसें कांहीं तेवढाच ह्यांचा धंदा. यानें महाराजास त्यांचे चिरंजीव अद्याप जिवंत आहेत असें समजाविलें; परंतु ज्याप्रमाणें ह्या येथें निजलेल्या गृहस्थास हे पोहताहेत हें म्हणणें संभवतें, त्याप्रमाणेंच तो राजपुत्र बुडून मेला नाहीं हें म्हणणें शोभतें.

**सिबाश्चियन**—तो बुडाला नसेल अशी आपल्यास तर कांहीं आशा नाहीं.

**अन्तोनिओ**—अरे, राजपुत्राविषयीं "आशा नाहीं"

म्हटलें म्हणजे याच नकारामध्यें अन्य विचार पाहिल्यास एखाद्याचे आशेस केवढा होकार मिळतो! राजपुत्राची आशा नसणें याच गोष्टींत दुसरी अशी मोठी आशा संभवते कीं दुर्निवार महत्वाकांक्षेची देखील दृष्टि तेथें खुंटून आचंब्यांत पडावी :—पण फर्दिनांद बुडाला ही गोष्ट तरी तुम्ही निर्विवाद कबूल करितां ना?

**सिबाश्चियन**—हो करितों; तो तर बुडालाच.

**आन्तोनिओ**—तर मग तुह्मी मला सांगा कीं आतां महाराजाचे मागें नेपल्सच्या गादीवर कोणाचा हक्क पोंचतो?

**सिबाश्चियन**—महाराजांची मुलगी क्यारिबेल इचा.

**आन्तोनिओ**—काय ती ट्यूनिसची राणी झाली आहे क्यारिबेल, तिचा? ती, जी इतकी दूर पडली आहे कीं परत येण्यास सर्व आयुष्यभर जरी मजला केल्या तरी पांच पन्नास कोस नेपल्सपासून जी दूरच राहणार? ती, जीस नेपल्सहून पत्र पोंचवूं ह्मटल्यास डाकवाल्याचें काम प्रत्यक्ष सूर्यानें केल्यासच होणार; कारण चंद्रस्थ जो मनुष्य तोही या कामास जडच ठरणार;—आणि सूर्यासही ती कामगिरी बजावण्यास इतके दिवस लागतील कीं, तितक्या काळांत काल आज जन्मलेल्या पोरांस क्षौर करण्या जोग्या राठ दाढ्या ही येतील! क्यारिबेल, कीं जिच्या योगें आज सर्व आपण समुद्रांत बुडालोंच होतों व कांहीं थोडेसे मात्र पुन्हां जमिनीस लागलों, आणि नशिबाचे जोरानें आजपर्यंत जें घडत आलें, तेंच पूर्वक्रम समजून पुढें ज्या योगें आपली सुटका होईल असें करणार, ती काय क्यारिबेल राणी होणार आहे?

**सिबाश्चियन**—कोण तरी ही बडबड! काय तुमच्या बोलण्यांतील अर्थ तरी असावा? अहो आमच्या भावाची ती

मुलगी ट्यूनिस येथील राणी आहे, व नेपल्सच्या गादीवरही तिचाच खरा हक्क पोंचतो, हेंच खरें. ट्यूनिस व नेपल्स यांमध्यें कांहीं छेटी आहे खरी; पण असली म्हणून!

आन्तोनिओ—ही छेटी अशी आहे कीं, तींतील प्रत्येक अंगुळ जसें कांहीं मोठ्या मोठ्यानें ओरडतेंच आहे कीं, "पाहूं कशी ही क्यारिबेल आम्हांस उलंघून नेपल्स संस्थानास परत जाते तीं; तिनें ट्यूनिसमध्येंच आतां रहावें, पण सिबाश्चियनानें मात्र जागें व्हावें.—पण कायहो, बोला कीं आतां. जे हे येथें निश्चेष्ट पडले आहेत, हे मरूनच पडले आहेत अशी कल्पना करा.—मला वाटतें यांच्या या सध्याच्या दशेपेक्षां मरण कांहीं यांना वाईट नाहीं हे मेले तर यांच्यापेक्षां बापचढाई राज्य करण्यास नेपल्स येथें दुसरे काय कोणी सांपडणार नाहींत असें नाहीं. या गोंझालोप्रमाणें उगेच बाष्कळपणें लांब लचक बडबडणारे मानकरीही मिळणार नाहींत, असेंही नाहीं. मी तर एकाद्या कावळ्यास देखील याप्रमाणें बडबडण्यास शिकवीन. अरे, माझ्या प्रमाणें जर तुझें मन हिम्मतदार असतें, तर या यांच्या अशा गाढ निद्रेपासून तुझा काय उपयोग नसता झाला? माझे बोलण्यांतील अर्थ समजलास कीं नाहीं!

सिबाश्चियन—हं, हं, कांहींसा समजलोंसें वाटतें.

आन्तोनिओ—मग आतां आपली हिम्मत आपले नशिबाची कशी काय सेवा करूं ह्मणते?

सिबाश्चिनय—तुझा भाऊ प्रोस्पेरो यास तूं ही हांकून लावून त्याची गादी बळकाविली आहेस;—आतां वागलें तें सर्व माझे मनांत.

आन्तोनिओ—खरेंच, आणि पहा तेंव्हांपासून हे

आंगरखे कसे आह्मांस शोभूं लागले आहेत;—कसे तंग होऊं लागले आहेत! माझ्या भावाचे जे नौकर ते पहिल्यानें माझे स्नेही ह्मणवीत होते, आतां त्या चट सर्वांस किंकर बनवून सोडिलें आहे.

**सिबास्चियन**—पण अंतरात्मा तुझा तुला खात नसेल कां?

**आन्तोनिओ**—अहो महाराज, तो अंतरात्मा असतो तरी कोठें? जर त्याचे एकादे पायास टांचरूं झालें असतें तर फारतर जोडा घालून रगडून टाकिलें असतें. पण बुवा आपले अंतःकरणांत या देवतेचा कोठें वास आहे असें आपणांस वाटत नाहीं. माझ्यामध्यें आणि मिलनच्या गादी-मध्यें जर असे दहावीस शुद्ध अंतरात्मे दगडासारिखे घण घेऊन आले, तरी त्यांपासून मला दुःख होण्याचे आधींच, ते वितळून जातील. असो: हा तुझा भाऊ येथें निजला आहे;—ज्या जामिनीवर तो पडला आहे तिजप्रमाणें तो नि-श्चेष्ट आहे; परंतु जर या मृत्तिकेप्रमाणेंच त्याची स्थिति झाली, ह्मणजे जर हा मेला तर? या हुकुमबंद तरवारीच्या योगानें, या एवढ्याशा इच्या टोकानें, यास अक्षय निद्रिस्त तेव्हांच करितां येईल; आणि तसेंच तुह्मांसही, हा असा जरा झटका मारून या थेरड्यास ही, मुक्तीस पाठवितां येईल. ह्मणजे हे शाहणे मुनींद्र पुढें आमच्या भोंवतीं कर्मकटकट करण्यास येणार नाहींत. इतर मंडळीचें तर काय, मांजर जसें दा-खवितांच दूध लबलब पितें त्याप्रमाणें, ते तर आमचें सर्व ह्मणणें मान्य करतील. आह्मीं सूर्य पश्चिमेस उगवला ह्म-टल्यास तेही तसेंच ह्मणतील.

**सिबास्चियन**—प्रिय मित्रा, तूं जें केलेंस तेंच मी प्रमाण

समजतों. ज्याप्रमाणें तूं मिलन संस्थानची गादी आपलीशी केलीस, त्याचप्रमाणें मी नेपल्सचें संस्थान प्राप्त करून घेतों. उपस तर आपली तरवार. तुला जो खंड द्यावा लागतो त्यापासून तुझी मुक्तता या एका घावासरशी होईल. आणि मी ही; राजा झाल्यावर, तुजवर बहुत प्रीति करीन.

**आन्तोनिओ**—आपण दोघेही एकदमच तरवारी उपसूं. आणि मी जेव्हां प्रहार करण्यास हात उचलीन तेव्हां तूंही गोंझालोचा गळा कापण्यास हात उचल.

**सिबास्टियन**—पण अधीं तुझ्या कानांत एक गोष्ट सांगायाची आहे. [दोघे एकीकडे जाऊन खलबत करितात.]

[अदृश्य रूप घेऊन गात गात एरियल येतो.]

**एरियल**—तूं माझ्या धन्याचा मित्र आहेस. त्यानें, तुजवर जें हें संकट येत आहे तें अधींच जाणून, तुह्मीं सर्वांनीं जिवंत राहावें ह्मणून मला येथें पाठविलें आहे; जर कोणी तुह्मांतून मेले तर त्याचा सर्व बेत विसकळेल.

[एरियल गोंझालोच्या कानाशीं गाणें गातो.]

**साकी.**

॥ घुर्र घुर्र बुवा हो पडला घोरत निद्रेमध्यें तुह्मी ॥
॥ बंडखोर परि जागति लागा साधाया लवलाही ॥ १.॥
॥ उठा उठा गोंझालो लवकर प्राणा व्यर्थ मुकाल ॥
॥ असेल जरि काळजी जिवाची सत्वर जागे व्हाल ॥ २॥

**आन्तोनिओ**—हुं; हुं; पहातां काय, करा जलदी.

**गोंझालो**—अरे बाप! ईश्वर महाराजांचें रक्षण करो!

[सर्व जागे होतात.]

काय, असें काय आहे हो!—जागे व्हा हो जागे व्हा!

काय हो तुह्मीं तरवारी काय ह्मणून उपसल्यात, आणि असे कावरे बावरे कां दिसता! काय झालें आहे!

**सिबाश्चियन**—अहो, तुह्मी निजला असतां आम्ही येथें पहारा करण्यास उभे राहिलों, आणि हा आतांच आम्हीं रान गव्यांच्या घोर आरडण्याप्रमाणें गोंगाट ऐकिला. न जाणो कां तें सिंहाचें ओरडणें! तुम्ही त्यानेंचना पण जागे झालांत! माझे कानांवर तर मोठा भयंकर शब्द पडला.

**आलोंझो**—आपणांस तर, बुवा, कांहीं ऐकू आलें नाहीं.

**आन्तोनिओ**—अरे बाप! तो नाद असा भयंकर होता कीं एकादें भूत देखील ऐकून पळालें असतें. जसे कांहीं धरणीकंपच होताहेत. कांहीं म्हणा, एकाद्या सिंहाच्या कळपाच्या कळपानें गर्जना केली असावी.

**आलोंझो**—गोंझालो, पण तूं कांहीं गलबल ऐकिलीस काय?

**गोंझालो**—महाराज, मी खरेंच शपथ घेऊन सांगतों कीं, कांहीं गुणगुणल्यासारिखा नाद मीं ऐकिला खरा. ती गुणगुण कांहीं चमत्कारिक होती, तिच्या नादानें मी जागा होऊन आपणांस हलविलें, आणि मोठ्यानें हाका मारिल्या: आणि डोळे उघडून पहातों तों हे दोघे तरवारी उपसून उभे आहेत. कांहीं गलबला झाला होता हें तर खचित.–आपण आपलें सावध राहवें हें ठीक; नाहीं तर ही जागा तरी सोडून कोठें दुसरीकडे जावें. उपसा आपल्या तरवारी.

**आलोंझो**—चला, ही जागा सोडूं, आणि बिचाऱ्या मुलाचाही शोध करूं.

**गोंझालो**—या हिंसक पशूंपासून ईश्वर त्याचा सांभाळ करो! तो या बेटांत आहे याविषयीं तर संशयच नाहीं.

आलोंझो—चला, चालायास तर लागा.

[ सर्व जातात. ]

**एरियल**—मीं काय केलें हें, माझा मालक प्रोस्पेरो यास सांगायास जातों. राजा, तूं स्वस्थ आपल्या मुलास शोधीत.

प्रवेश १ ला समाप्त.

---

## प्रवेश दुसरा.

बेटावरील दुसरा एक भाग.

[क्यालिबन लांकडांचें ओझें घेऊन येतो, विजांचे गडगडाट चालले आहेत.]

**क्यालिबन**—सूर्य आपल्या किरणांनीं चटसाऱ्या पाणथळींतून, दलदलींतून, आणि मैदानांतून ज्या मुरदाड वाफांचें ग्रहण करितो, त्या चटसाऱ्या प्रोस्पेरोस घेरोत, आणि कोठें तीळ ठेवण्यास जागा न सांपडे असें त्याचें शरीर मरेसें करून टाकोत; त्याचीं दुसरीं भुतें माझें बोलणें सर्व ऐकत असतील; परंतु त्यास शिव्या दिल्याशिवाय माझ्यानें राहवतच नाहीं. परंतु प्रोस्पेरोच्या सांगण्याखेरीज तीं मला चिमटे घेणार नाहींत; भूतचेष्टा करून भेडवणार नाहींत; चिखलांत गाडणार नाहींत; रस्ता सोडून भलतीकडे अंधारांत आंगास कोलीत लावून इकडे तिकडे हिंडवणार नाहींत. पण काय करावें, एवढ्या तेवढ्या करितां तो तीं भुतें मजवर सोडितो. मग तीं मला माकडासारिख्या वाकोल्या दाखवितात; गुरगुरावून आंगावर येतात, चावतात; साळूचें रूप घेऊन मी अनवाणी पायानें चालत असतां माझ्या रस्त्यांत पडतात, व

मला अडकवून पाडून, तिच्या सळया माझ्या पायांत शि-रविताव; केव्हां केव्हां सर्व माझ्या आंगावर साप चढवून सर्वांग वेष्टितात, आणि ते साप आपल्या दुशेंड्या जिभा बाहेर काढून फुसफुस करून मला अगदीं वेडा करून टाकितात. अगे बाईगे! आतां कसें करूं! तें पहा तेथें एक त्याचें भूत येत आहे. मला वाटतें, मी असा रेंगाळत रेंगाळत त्याकडे आणीत आहे, ह्मणून मला मार देण्यासच त्यास पाठविलें आहे: मी आपला पालथा जमिनीवर पडतों कसा; ह्मणजे कदाचित् त्यास दिसणार नाहीं.

[त्रिंक्युलो येतो.]

त्रिंक्युलो—ह्या जागेंत वाऱ्यापासून आसरा मिळेल ह्मणून एवढें झाड का झुडुप पाहूं लागल्यास काहीं नाहीं. आणि पुन्हां वावटळीची तर तयारीच दिसत्ये. त्या बयाचें हें गाणें वाऱ्यासरसें ऐकूं येत आहे. तो पहा पलीकडचा काळा ढग अगडबंब, जणुकाय दारूचा बुधलाच भरला आहे! आणि पण कुचक्या बुधल्याप्रमाणें गळण्याच्याच बेतांत जणु आहे. जर का मघांसारख्या विजा पुन्हां चालूं लागल्या तर कोठें डोकें लपाविण्यास सुद्धां येथें जागा नाहीं. ह्या ढगांतून मुसळधार पाणी पडल्याशिवाय राहायाचें नाहीं. अरे! पर येथें हें काय पडलें आहे! काय यास माणूस ह्मणावें, का मासा! पण अधीं हा जिवंत आहे का मेला कोण जाणे! अरे हा मासाच, खरा. याच्या आंगाची बू पहा बोंबलावाणी येत आहे; हा वास तर आपल्या पुरा ओळखीचान्! जणु राबलेल्या बोंबलावाणी येत आहे. काय चमत्कारिक बेठा मासा पर हा! पर याविळेस जर मी मागें गेलों होतों तसा इंग्लंदांत असतों, आणि का चितान्याकडून या मा-

देते त्याचे मालकास पैशाची कमताई नाहीं. अरे एखाद्या लंगड्या भिकाऱ्यानें एक पैशाचा सवाल केला तर, त्यास तो इंग्लंदाचे लोकांपासून मिळायाचा नाहीं, पण एखादें हपश्याचें प्रेत जरी कोणीं आणिलें, तरी तें पाहण्यास ह्मणून लोक एक सोडून दहा पैसे खर्च करतील. अरे इच्या बल! पर याचे पाय माणसावाणी कीं आहेत! आणि याचे पंखही माणसाच्या हातावाणी! थुत; ह्मटलें तें सारें खोटें! हा कांहीं मासा नव्हे वीज बीज पडून नुकताच मरून पडलेला या बेटांतील माणूस आहे. (मोठ्यानें गडगडतें) अरे बाप! आलें पुन्हां तुफान. आतां या माणसाच्या आंगरख्यांत दडून रहावें यापरता दुसरा उपाय नाहीं. या येथें दुसरा कांहीं आसराच नाहीं. ह्मण आहे ती खरी; भोग्यास मिळेल तशी रात्र काढणें भाग. आतां हें वादळ समूळ मिटे पर्यंत गुरगुटून घेऊन याच्या येथेंच पडतों.

[स्तिफानो गात गात हातांत एक दारूची बाटली घेतलेला येतो; स्तिफानो गातो] स्तिफानो [लावणी ह्मणतो]:—

॥ आतां नाहिं कधिं या दर्यावामधिं जाणार ॥
॥ या धर्तीवर आपुण आपल मरणारजी ॥ धृ ॥

हें तर ओंगळ गाणें. एकाद्याचे दिसाविसास ह्मणण्यासारखें. जाऊंद्या कीं, आपलें सुख तर या बाटलींत आहेच [दारू पितो व गातो.]

॥ तांडेलान फरासान नाथाडयान अन मीनवी ॥ भुल देऊन ॥
॥ भुल देऊन मेळ केला ॥ साव्हू येणू अन चिमणीला ॥
॥ इठीं राधी या समद्याला॥भुलदेऊन मेळ केलारजी॥आतां नाहिं॥ छ॥१॥

॥ त्यांत होती येक केकता ॥ तिच हेल नांव सीता ॥
॥ तिच्या साठीं खाल्या खस्ता ॥ पर लागनाव हाता हो तीजी ॥
॥ परजाऊं थाकिं रांड यस्वला कोण बघणार॥ आतां नाहिं कधिं ॥ छ॥२॥

॥ कोळी गेला कां तिच्या वाटा ॥ कीं चाललाच तोंडसपाटा ॥
॥ मग तिच्चि जिभ वाजजशी घंटा ॥ काय सांगाव तें रांडरू व राडरू॥
॥ कोन तिच्या वाट जाणारजी ॥ आतां नाहिं ॥ ३ ॥

॥ म्हण त्येच्या आंगाला येति लई घाण ॥ तिला सोसना ती मशान ॥
॥ परव्हाव तिथ खाजवाव शिंप्यान ॥ काय सांगाव तें रांडरू व राडरू॥
॥ कोण तिच्या वाटजाणारु जाणारु ॥ आतां नाहिं ॥ छ ॥ ४ ॥

हें देखील गाण कसनसच बुआ; पण आपली ही दुःखाची मातुसरी तर कोठें गेली नाहीं?

[ आणखी दारू पितो ].

**क्यालिबन**—अरे! मला असें नको छळूं ओ! ओ!

**स्तिफानो**—ही गडबड कसची! येथें भूतबित तर नाहींना? काय हो राजश्री, असे गोंड बंगाली, राक्षसी, व माणुसी खेळाचे तमाशे दाखवून चेष्टा करण्याचा तुमचा बेत आहे आं! अहो मी समुद्रांतून बुडतांना वांचलों आहे, तो तुमच्या या चार उपराळ्या पायांस भिईन कीं काय? कारण अशीतर ह्मणच आहे कीं, बुडतांना वांचलेल्यास धडधडीत चार पायांवर चालणाऱ्या भुताच्यानें देखील कांहीं करवणार नाहीं; आणि जों पर्यंत या स्तिफानो पठ्याचे जिवांत जीव आहे, तों पर्यंत या ह्मणीची खरी प्रचीती तुह्मांस हा आणून देईल.

**क्यालिबन**—हें भूत मला मारतें रे मारतें, ओ!

**स्तिफानो**—हा कोणी तरी चार पायांचा या बेटांतील

ची बोली कोणी शिकविली? हा आमची बोली बोलत आहे एवढ्या वरूनच यास कांहीं तरी मी दवादारू करितों; कारण जर हा बरा होऊन माणसाळेल, आणि मला यास बरोबर घेऊन नेपल्स शहरास परत जातां येईल, तर यास कोणत्याही दिमाखदार बादशाहास नजर करितां येईल.

**क्यालिबन**—अरे बाबा, मी तुझ्या पायां पडतों. तूं मला आतां छळूं नकोस. आजपासून मी लाकडें जलदी जलदी आणीन.

**स्तिफानो**—हा अजूनही त्याच वाऱ्यांत आहे व भानावर नसल्यामुळें नीट संगतवार बोलत नाहीं. या बाटलींतील रस यास थोडासा पाजतों, म्हणजे जर हा कधींच अंगुराची शराब पूर्वी प्याला नसेल, तर एवढ्यानेंच बहुधा याची इजा दूर होईल. हा नीट होऊन मजजवळ गरिबीनें राहील तर, याचा जितका पैसा येईल तितका थोडाच. जो यास विकत घेईल त्याचे जवळून खूप पैसे मारीन.

**क्यालिबन**— तूं एव्हां फारशी दुखापत करीत नाहींस; पण तूं थरथर कांपूं लागला आहेस, यावरून प्रोस्पेरो आतां तुझ्या आंगांत येऊं लागला; तूं आतां थोडक्यांतच छळण्यास प्रारंभ करणार असें दिसतें.

**स्तिफानो**—अरे दादा, शुद्धीवर ये आणि उघड तोंड आपलें. ही पहा मजजवळ अशी वस्तु आहे कीं, मांजरा, तुला देखील ती वाचा देईल. उघड तर तोंड, तुझ्या आंगांतील ही सर्व कांपरें पळवून टाकील; मी हें तुला खात्रीनें सांगतों. तुजवर हा कोण उपकार करितो, हा कोण

मित्र आहे, हें तुला काय ठावें असणार? उघड आणखी जाभाड.)

**त्रिंक्युलो**—हा शब्द तर ओळखीचा दिसतो. हा बहुधा स्तिफानोचा असावा. पण तो तर बुडून मेला; म्हणून ही सारी भूतचेष्टा आहे. अरे बाप! माझें ईश्वर संरक्षण करो!

**स्तिफानो**—चार पाय आणि तोंडें पण दोन! मोठा विलक्षण राक्षस तरबा हा! [हा पुढील तोंडानें, वाटतें, आपल्या मित्राचें शुभ बोलतो, आणि अभद्र व दुष्ट बोलण्याचें काम याचे मागील तोंडानें पत्करिलें आहे. जरी या बाटलींतील सर्व दारू खपली तरी चिंता नाहीं, पण हा जर नीट होत असेल तर, तितकी यास पाजीन.) चल रे ये, घ्या एकदां कसें ईश्वराचें नांव. येरे, कर तुझें तोंड असें. तुझ्या पुढच्या तोंडांत थोडीशी दारू ओततो.

**त्रिंक्युलो**—कोण तूं,-स्तिफानो?

**स्तिफानो**—काय हो आपलें तें खालचें तोंड मला नांवानीं पण हाका मारूं लागलें काय? ईश्वरा कृपा कर, खैर कर; कारण हें भूत आहे: हा विजातीय प्राणी कांहीं या बेटावरील नव्हे; आपण जातों रे बुवा येथून. आपले जवळ भुतांस आकळणारा लांब चमचा थोडाच आहे.

**त्रिंक्युलो**—स्तिफानो! जर खरोखरीच तूं स्तिफानो असशील, तर माझ्या आंगावरून हात फिरीव, आणि मशीं बोल. मी त्रिंक्युलो आहें. कांहीं भिऊं नकोस. तुझा मी त्रिंक्युलो; तोच मी आहें.

**स्तिफानो**—जर खराच तूं त्रिंक्युलो असलास तर ये बाहेर. या लहान तंगड्या धरून मी तुला ओढून काढितों—जर या चार पायांतील कांहीं त्रिंक्युलोचे पाय हांत अस-

करतां येते कीं काय?

**त्रिंकुलो**—मला वाटत होतें कीं, हें धूड विजेच्या तडाक्यानें मरून पडलें आहे.—पर गड्या स्तिफानो, तूं बुडाला नाहींस काय? आतां मला आशा वाटते कीं तूं नाहीं बुडालास. पण सारें तुफानफिवान आतां तरी संपलें कीं नाहीं? या मढ्याधुडाच्या अंगरख्याखालीं वादळाच्या भीतीनें मी लपून बसलों होतों. तूं पण स्तिफानो, तूं बरारे वांचलास? अरे स्तिफानो, एका गांवचे आपण एकास दोघे असे वांचलों; हें फार बरें झालें, स्तिफानो.

**स्तिफानो**—अरे बाबा, असा मला घुसळून घुसळून नको घेऊंस. ओकेनबिकेन एकादा.

**क्यालिबन**—(आपणांशीं) हे मोठे सुंदर प्राणी आहेत. पण जर भुतें नसतील तर! तो तर एक मोठा सुंदर देव दिसतो; आणि त्याच्या या हातांतील पात्रांत अमृत असावें; चला कसें, जाऊन त्याचे पायांवर डोकीं ठेवूं.

**स्तिफानो**—तूं कसारे वांचलास आणि येथें कसा आलास? हें सर्व या बाटली माउलीवर शपथ खाऊन खरें सांग. ह्या प्रत्यक्ष बाटलीचीच शपथ घेऊन तुला सांगितलें पाहिजे बरें. मी तर खलाश्यांनीं जहाज हलकें करण्या करितां म्हणून एक दारूचें पिंप समुद्रांत टाकिलें त्याच्या आधारावर कडेस लागलों. पाहिजे असल्यास या बाटलीचीच शपथ घेऊन सांगतों हें. कडेस येतांच झाडाच्या सालीची ही बाटली बनविली;—समजलें?

**क्यालिबन**—[मध्येंच] मी या बाटलीवर शपथ घेऊन सांगतों कीं, मी तुझा गुलाम होण्यास कबूल आहें. कारण ही दारू म्हणजे केवळ स्वर्गांतील पदार्थ आहे.

**स्तिफानो**—हूं; चल घे तर शपथ. कसा तूं वांचलास त्याची.

**त्रिंक्युलो**—बदकावाणी पोहोत आलोंन काय मर्दा! मी तरी बदकासारिखा खुप पोहणारा आहें; पाहिजे असल्यास शपथ घेतों.

**स्तिफानो**—ही पहा पहिल्यानें या बाटलींतील गंगाबाई, आणि मग वहा यावर शपथ. कारण तूं म्हणतोस मी बदकावाणी पोहणारा, पण तुझ्या आकृतीवरून तर तूं निंवळ राजहंसच दिसतोस.

**त्रिंक्युलो**—अरे स्तिफानो, पण एवढीच नारे कायती आपणापाशीं ही?

**स्तिफानो**—वारे मर्दा! एवढ्यानें काय होतें! एक पिंपाचें पिंप भरलेलें आहे. समुद्राचे कांठीं सर्व दारू भुयार करून तेथें लपवून ठेविली आहे.—कां राक्षसा, तुझी पोटदुखी कशी आहे आतां?

**क्यालिबन**—पण तुम्ही स्वर्गांतून आले आहात नव्हे हो?

**स्तिफानो**—स्वर्गांतून नव्हे, चंद्रावरून आलों. आम्ही तुला खरेंच सांगतो. तसेच कांहीं दिवस होते, तेव्हां चंद्रामधील मनुष्य जो म्हणतात तो मी होतों.

**क्यालिबन**—खरेंच रे खरेंच. मीं तुला एकदां चंद्रांत पाहिलें होतें खरें. बा, मी तुझ्या पायां पडतों. आमच्या आईसाहेबांनीं मला तूं दाखविला होतास. तुझा कुत्रा आणि तुझीं काटकें सर्व दाखविलीं होतीं.

**स्तिफानो**—चल घेतर शपथ याची; ही पहा गंगाजळी! यांतील ती संपली आहे, पण कांहीं चिंता नाहीं. आतां पुनः इतक्यांत इला भरून काढितों. शपथ तर घे.

**त्रिंक्युलो**—या सूर्याच्यान् मी खरेंच सांगतों, हा राक्षस अगदीं भोळवट आहे; अं:, हा तर काय अगदीं निर्जीव! काय म्हणावें यास, चंद्रांतील मनुष्य खराच समजतो हा! बेटा अगदींच बावळा! पण ठीक: राक्षस बुवा, तुमची तर खुबच चैन आहेना राव?

**क्यालिबन**—मी तुला या बेटांतील चटसारी तीळन्-तीळ चांगली जागा दाखवून देईन, आणि तुझी पायधूळ खाईन. मी आपली विनंती करितों. आपण माझे कुलस्वामी व्हावें.

**त्रिंक्युलो**—हा मोठा लुच्चा आमली राक्षस दिसतो. कुलस्वामींना झोंप लागलीशी संधी पाहून यांची एवढी बाटली हा लांबविणारसें दिसतें.

**क्यालिबन**—मी तुमच्या पायांवर डोकें ठेवतों. माझे आतां तुह्मी राजे ह्मणून शपथ वाहतों.

**स्तिफानो**—चल तर चल. वांक खालीं आणि खा शपथ.

**त्रिंक्युलो**—या वेड्या राक्षसाकडे पाहून हांसतां हांसतां माझा जीव जाईल. कायतरी हेन्रा! याला खुब चांगलें बडवावें ह्मणून माझे हात कसे सळसळ करताहेत.

**स्तिफानो**—हुं ठेव तर पायांवर डोई.

**त्रिंक्युलो**—हा वेडा राक्षस दारू प्याला आहे, नाहीतर खुब चांगली कम्बख्ती काढिली असती या भिकारड्या राक्षसाची.

**क्यालिबन**—मी तुह्मांला गोड्या पाण्याचे सर्व झरे दाखवीन. तुह्मांला फुलें तोडून आणित जाईन. मासे धरित जाईन, आणि खुब लांकडें आणित जाईन. ज्या दुष्टाच्या मी आतां चाकरींत आहें तो मरो लेकाचा पटकीनें. आजपासून त्याचें कबाड नाहीं वाहयाचा. हे उत्तम माणसा, आजपासून मी तुझीच चाकरी करीन.

**त्रिंक्युलो**—काय ओंगळ राक्षस हा! या दारूबाजाची यास मोठी अपरूपाई वाटत आहे!

**क्यालिबन**—माझी विनंती अशी आहे कीं, आपण मजबरोबर रानटी सिताफळें उगवलीं आहेत तेथें चलावें. मी आपल्या लांब नखांनीं खणून तुह्मांला गाजरें देईन. तुह्मांस खाण्यास मधपोळी दाखवीन. आणि चपळ खडीस कसें धरावें तें शिकवीन. करवंदाचे घडचेघड जेथें लागले आहेत तेथें तुह्मांस घेऊन जाईन; आणि मी तुह्मांस कधीं कधीं तांबडे पक्षी धरून आणून देत जाईल. चलतां कां तुह्मी आतां माझ्या बरोबर!

**स्तिफानो**—आतां फार गडबड करूं नकोस. चल तर कोठें चलतोस तो. अरे त्रिंक्युलो, राजा व चटसारे त्याचे बरोबरचे लोक बुडून मेले आहेत. तेव्हां या बेटाचे आतां मालक आपणच. (क्यालिबनास) अरे ही बाटली हातांत धर, आणि चाल पुढें; गड्या त्रिंक्युलो, ही रिकामी झाली आहे ती थोड्याच अवकाशानें भरून काढीन. (क्यालिबन झिंगून गाणें गातो).

**क्यालिबन**—मालक! रामराम, मालक! रामराम, रामराम!

**त्रिंक्युलो**—वाहवारे राक्षस! झिंगून कसा ओरडत आहे.

**क्यालिबन**— ॥ वावार क्यालिबन वावार ॥

[॥ मिळ तुला नव माणुसर ॥ जीजी ॥ छ ॥
॥ बांध घालुन पाण्यालार ॥
॥ मास कधी नाहिं धरणार ॥
॥ नाहिं सरपण आणणार ॥
॥ कधी नाहिं भ ड घासणार ॥
॥ आतां सुटका—वावार ॥
॥ झाली सुटका लइ मज्जार ॥ जीजी ॥
॥ वावार क्यालिबन वावार ॥
॥ मिळ तुला नव माणुसर ॥ जीजी ॥ १ ॥]

अंक दुसरा समाप्त.

---

## अंक ३ रा प्रवेश १ ला.

स्थल—प्रोस्पेरोच्या गुहेपुढील जागा.

[फर्दिनान्द डोकीवर एक मोठें लांकूड घेऊन येतो. ]

**फर्दिनान्द**—कित्येक खेळ असे असतात कीं, त्यांमध्यें जिवास श्रम तर विशेष होतात, परंतु त्या खेळांमध्यें आनंद ह्मणून जो कांहीं मानलेला असतो, त्याच्या योगानें श्रमांचा खेद वाटत नाहीं. कांहीं कांहीं कामें हलकीं असतांही मानपुरस्सर समजून तीं लोक हौसेनें करितात. आणि तसेच [आपणास क्षुल्लक वस्तूच्या साहाय्यानें उत्तम वस्तुलाभ वारंवार होतात. ही माझी काबाडकष्टाची शिक्षा एरवी जशी लज्जास्पद आहे, तसाच मला इचा कंटाळाही आला असता; परंतु ज्या प्रियेचा मी दास आहे, तिच्या प्रेरणेमुळें असले मुरदाड कामासही जीव येतो; व मला जे कष्ट करावे लागताहेत, त्यांचा आनंद होतो.] अहाहा! या तिच्या उद्धट

बापापेक्षां ती तर दसपट सौम्य आहे. हे बुवा तर आंतून बाहेरून जसे फत्तरच. त्याच्या केवळ सांगण्यावरूनच निरर्थक हजारों हीं लांकडांचीं दुंडें उचलून एकावर एक रचून ठेवणें मला भाग पडलें आहे. मला असें कठिण काम करतांना पाहून माझी प्रिया रडते, आणि ह्मणते कीं, असलें हलकें काम करण्यास असा मोठा मनुष्य कधींच मिळाला नसेल. अरे, परंतु या असल्या नादांत मी काम करायाचें विसरतों. पण काय करावें ? असे रमणीय विचार मनांत आले म्हणजे थकवा जाऊन उमेद येते. हे विचार मनांत नसले म्हणजे मात्र या श्रमापासून अतिश्रम होतो. [मिरांदा आंत येते] [आणि प्रोस्पेरो कांहीं अंतरावर त्यांकडे पहात उभा राहतो.]

**मिरांदा**—कायरे देवा हें ! अहो तुम्ही अशी कठीण मेहेनत नका तरी करूं. या मेल्या तुळया तुम्हास रचावयास सांगितल्या आहेत, यांजवर वीज पडून मेल्या जळून जातील तरी बरें. ऐका तरी थोडें. ही हातांतील तुळई ठेवा खालीं, आणि कांहीं विसावा घ्या. जेव्हां हीं लाकडें जळतील, तेव्हां तीं देखील आपणास त्यांजकरितां पडलेले श्रम आठवून रडूं लागतील. माझे बाबा आतां एकचित्तानें पाठ करायाला बसले आहेत, म्हणून माझी विनंती ऐकून थोडा वेळ विश्रांती घ्या. आतां तीन प्रहर पर्यंत बाबांची इकडे येण्याची निश्चिंती आहे.

**फार्दिनान्द**—हे प्रिये, जें काम मला केलें पाहिजे, तें शेवटास जाण्याचे पूर्वींच सूर्य अस्तास जाईल, म्हणून मला उगेंच बसतां नये.

**मिरांदा**—जर तुम्ही कांहीं वेळ खालीं बसाल तर तुमचे

बसून असल्या हलक्या कामानें तुझी विटंबना करवावी, त्यापेक्षां हें काम करितां करितां माझ्या स्नायू सर्व तुटल्या, आणि कंबर जरी मोडली, तरी चिंता नाहीं.

**मिरांदा**—हें काम तुह्मास जसें शोभतें तसें मलाही शोभेल. आणि काम करण्याची हौस असल्यानें हें मला सोपें जाईल. तुह्मी तर निरुपाय होऊन तें करीत आहांत.

**प्रोस्पेरो**—(आपल्याशीं) बेटी जळू! तूं आतां हुरावलीस; तूं याची गांठ घेण्यास आलीस यावरूनच हें उघड दिसतें.

**मिरांदा**—तुम्ही किती तरी अगदीं थकून गेलां असें दिसतें.

**फर्दिनान्द**—हे सुशील प्रिये, मी नाहीं थकलों; तूं जवळ असतां काळोखी रात्र देखील मला देदीप्यमान प्रभातसमयाप्रमाणें आनंददायक होईल; पण मी एक पुसतों,—दुसरे कशाकरितां ह्मणून नाहीं, केवळ संतमालेमध्यें घेण्यास माहित असावें ह्मणून,—कीं तुझें नांव काय?

**मिरांदा**—माझें नांव मिरांदा.—अरे माझ्या बाबा, याला नांव सांगून तुझी कीं रे आज्ञा मीं मोडिली!

**फर्दिनान्द**—हे प्रिये मिरांदा, नवलसुंदरी, तुझें नांव यथार्थ आहे; कारण तुझे लावण्याची तर खरोखर कमालच आहे; या सृष्टींतील सर्व अमोलिक वस्तूंनींही तुझे गुणांचें मोल होणें नाहीं. पूर्ण लक्ष देऊन आजपर्यंत मीं बहुत स्त्रिया अवलोकिल्या, आणि कित्येक वेळां त्यांच्या वाङ्माधुर्यानें माझे तृषायुक्त कान केवळ लुब्ध होऊन गेले. निरनि-

केवळ दोषरहित सर्व गुणपूर्ण तुजसमान स्त्री कधींही माझे पाहाण्यांत आजवर दुसरी आली नाहीं. हे प्रिये, तुजमध्यें कांहीं उणें नाहीं; आणि तुजसारखी स्त्री दुसरी झालेली नाहीं. सर्व प्राण्यांमध्यें जें जें चांगलें त्यांहीं करून तुझी घटना स्रष्ट्यानें केली आहे.

मिरांदा—आह्मा स्त्रीजातींतील दुसरी कोणी एकही कशी असते ती मीं पाहिली नाहीं; कोणत्याही बायकोचें तोंड मला आठवत नाहीं. आरशामध्यें मात्र माझें कायतें मीं तोंड पाहिलेलें; आणि पुरुष ही ह्मटले तर, हे सुमित्रा, एक काय तो तूं, आणि दुसरे आमचे प्रिय बाबा; याशिवाय कोणास मीं पाहिलेलें नाहीं; मुलखावर मनुष्यांचीं स्वरूपें कशीं असतात याची मला पारख नाहीं. परंतु जो माझें ग्रहण करील त्यास जी वरदक्षिणा मिळणार, तींतील उत्तम एक रत्नच अशी जी माझी अल्पाशा, तिचेठायीं तुजखेरीज दुसरा कोणी सहचर मिळावा अशी इच्छा नाहीं. तुजखेरीज प्रीतिपात्र दुसऱ्या कोणाची कल्पना देखील मनांत आणण्यास मी असमर्थ आहें. माझी जीभ पण बाई आज फार वाहवते आहे. आणि बाबांच्या आज्ञांचा तेणेंकरून विसर पडल्या सारखें होतें.

फर्दिनान्द—प्रिये, मी राजकुलोत्पन्न कुमार आहें, आणि मला वाटतें मी कांहीं आपण होऊन तें घेतलें नसतें, पण राजपणही आतां मजवरच आलें आहे. व जर एखादा नाकतोडा माझे तोंडावर झडपा घालघालून मुखविदारण

तुझी सेवा घडावी म्हणूनच येथें गुंतून राहिलें आहे. मला केवळ तुझा दास करीत होत्साते ते आतां तुझेच ठायीं वास करीत आहे. आणि तुजकरितांच मी हे कबाडकष्ट करित येथें राहिलों आहे.

मिरांदा—तुमची आहे तर मजवर प्रीति?

फर्दिनान्द—हे पृथ्वी, हे आकाशा, मी जें ह्मणतों ह्यास तुह्मी साक्षी रहा. आणि जर माझें म्हणणें मनापासून खरें असेल तर कृपाकरून सत्वर माझ्या मनोदयानुरूप माझी कामना सफळ करा; आणि जर हें कितवानें बोलत असलों तर जें माझें मंगल ठिकाणीं असेल, तें चढसारें उलट फिरवून माझा सत्यानाश जेणेंकरून होईल असें करा. ऐक, या पृथ्वींत सर्व वस्तूंपलिकडे तुजवर माझी प्रीति आहे. सर्व वस्तूंपेक्षां तुझा लाभ मी विशेष मानितों. आणि सर्वांपलीकडे माझे प्राणाची धनीन तूं आहेस.

मिरांदा—कायग बाई मी वेडी; हें ऐकून माझे मनास आनंद झाला आहे. आणि त्याचेंच मला बाई रडूं पण येतें!

प्रास्परो—दोन अद्वितीय प्रीतींचा हा संगम मोठा मनोरम आहे. जो व्यापार या दोघांमध्यें आतां घडत आहे, याजवर ईश्वर आशिर्वादांच्या वर्षाव करो!

फर्दिनांद—अग पण तूं रडतेस काय ह्मणून?

मिरांदा—आपल्यास जें मला अर्पण करावेंसें वाटतें, तें देण्याचें धैर्य होत नाहीं. आणि ज्याची प्राप्ती न झाल्यास

प्रकट होतात ह्मणून मागें पुढें पाहून उपयोग काय! हे लज्जारूप कैतवा, जा तूं आतां येथून! आणि हे पवित्र धर्माचारा, तूं माझे पाठीवर राहून मला धीर दे! जर आपण मजबरोबर लग्न कराल, तर मी आपली बायको होईन; पण जर आपली तशी मर्जी नसेल तर, मी आपली सेवा करणारी दासी होऊन यांच पायांजवळ मरेन. आपली सहधर्मचारिणी करण्यास आपणांस मला नाहीं ह्मणतां येईल, परंतु आपण कोठेही गेलांत तरी, मी आपले मागें, आपण कितीही नाराजी दाखविली तरी, आपली मोलकरीण दासी होऊन चलेनच चलेन.

**फर्दिनांद**—हे प्रिये! हे पत्नि, आणि मी ही तुझ्याशीं असाच अक्षय अप्रमत्तपणें वागेन.

**मिरांदा**—होता तर, तुह्मी माझे पति?

**फर्दिनांद**—ह्याप्रमाणें बंदिवान मुक्ततेचें मोठ्या राजी अंतःकरणानें ग्रहण करितो, त्याप्रमाणेंच मीही तुझें ग्रहण करितों. हा पहा माझा हात. कर याचें ग्रहण.

**मिरांदा**—आणि हा माझा हात, [याबरोबर माझे मनाचा पण ही मी संकल्प करितें; याचें आपणही ग्रहण करावें,] आणि आतां एक अर्ध तास पर्यंत मला येथून जाण्यास परवानगी असावी. आपला जय असो महाराज.

**फर्दिनांद**—मजपेक्षां हजारपट तुझा जय असो.

[फर्दिनांद आणि मिरांदा दोघेही जातात.]

मला झाला नसता. आतां मी जातों पोथी पाहायाला. कारण रात्रीच्या भोजनसमयाच्या आंतच या संबंधानें आणखी पुष्कळ कामें उरकलीं पाहिजेत. [जातो.]

[अंक ३ प्रवेश १ समाप्त.]

---

## अंक ३ प्रवेश २.

स्थल—बेटावरील आणिक एक दुसरा भाग.

[स्तिफानो आणि त्रिक्युलो येतात. त्यांचे मागें दारूची बाटली हातांत घेतलेला असा क्यालिबन चालतो.]

**स्तिफानो**—असली कांहीं एक गोष्ट बोलूं नकोस; पिंपांतली जेव्हां दारू संपेल तेव्हां मग पाणी प्यायाचें नांव. ह्मणून चांगली हिम्मत धरून लाव तडाखा. अरे चाकरमान्या राक्षसा, माझ्या नांवानें तूं पण झोंक पुनः दारू.

**त्रिक्युलो**—चाकरमान्या राक्षस, जणु या बेटांतील मूर्तिमंत वेडें पीकच! ह्मणतात कीं या बेटावर पांच जणच आहेत. पैकीं आह्मी तिघे आणि बाकी राहिलेले, राज्यधुरंधर जे आह्मी त्याप्रमाणेंच जर असले तर, ते दोघे.

**स्तिफानो**—पी रे चाकरमान्या राक्षसा; मीं सांगितलें कीं आपलें प्यावें. पुरे, तुझे डोळे तर बुवा अगदीं कपाळा जवळच लाविले आहेतनी!

तर हा राक्षस आहे याहूनही चमत्कारिक झाली असती खरी.

**स्तिफानो**—बुडविली एकदां आमच्या चाकरमान्या राक्षसानें आपली जीभ दारूंत! आपणास तर बुवा समुद्राच्यानें देखील बुडववेना. जमीनीस लागण्याचे पूर्वी पर असा पोंहलों. शंभर आणि पांच, अणिक अणिक बी कोस. सूर्याच्यान्र. अरे राक्षसा, मी बघ तुला माझा सुभेदार बनवीन, नाहींतर आपला जरीपटका.

**त्रिंक्युलो**—तुझी मर्जी असल्यास सुभेदार म्हण; पण जरीपटका होण्यास तो कांहीं निशाण बिशाण नाहीं लागला.

**स्तिफानो**—पण महाराज राक्षसबुवा, आह्माला कधीं पळ काढायाचा नाहीं बरें.

**त्रिंक्युलो**—पळही काढायाचा नाहीं, आणि चालायाचेंही नाहीं; आपलें कुत्र्याप्रमाणें जमीनीवर लोळायाचें मात्र. न का बोलणें ना कांहीं.

**स्तिफानो**—अरे राक्षसा, सांगरे बाबा, पर एकदां तरी खरें सांग कीं, तूं भरंवशाचा राक्षस आहेस ना?

**क्यालिबन**—असें काय बोलतां महाराज, आपण द्या आपला जोडा इकडे, मी पाहिजे तर त्याची धूळ खातों. मी त्याची नाहीं चाकरी करणार. तो भागुबाई आहे.

**त्रिंक्युलो**—खोटें बोलतोस तूं अगदींच अडाणी राक्षस; अरे मी तर मोठ्या पोलीसशिपायांला धक्का मारून निघून जाणारा ना! कायरे विद्या माशा, आज मी जितकी दारू प्यालों, इतकी कधीं कोण्या भागुबाईच्यानें पिववली आहे काय रे? अर्धा मासा आणि अर्धा राक्षस असा विद्रा तर तूं अर्धा आहे-





हा! पण तुम्ही त्याला अशी चेष्टा करूं द्याल काय? गरीब परवर!

**स्तिफानो**—"गरीब परवर" म्हणतो मला हा! राक्षस होऊन कायहो ह्याची गरीबी!

**क्यालिबन**—पहा हो पहा! तो पुनः तसेंच करितो. मी पायां पडतों तुमच्या, त्याला जाऊन मारून ठाका करा.

**स्तिफानो**—त्रिक्युलो, आपले तोंडांतील जीभ चांगली आटपून धर. जर अशा बदमाषपणांत शिरलास तर, पहा हें फांशीं चढवण्यास जवळच झाड आहे. हा गरीब बिचारा राक्षस माझी रयत आहे. म्हणून त्याचा अपमान नाहीं मी होऊं देणार.

**क्यालिबन**—माझ्या मेहेरबानांचे फार उपकार झाले मजवर. पण मीं जी अर्जी केली ती पुनः एकदां खुष होऊन ऐकाल काय?

**स्तिफानो**—देवीच्यान् रे ऐकेन. तूं गुडघे टेकून खालीं नमून बैस, आणि काय अर्ज करणें तो लाग सांगण्यास; मी ऐकण्यास असा उभा राहतों, आणि त्रिक्युलोही पण उभा राहील.

[अदृश्यरूप धारण करून एरियल येतो].—

**क्यालिबन**—मीं आपणास अधीं सांगीतलेंच आहे कीं मी एका महा जुलम्याचा चाकर आहें. तो जुलमी मनुष्य मंत्री आहे, व त्यानें आपल्या मंत्राच्या जोरानें हें बेट मजपासून हिरावून घेतलें आहे.

**एरियल**—खोटें बोलतोस तूं.

**क्यालिबन**—तूंच खोटें बोलतोस. लेका चेष्टेखोर माकडा. माझा शूर मालक तुझा नाश करून टाकील तरी बरें. मी नाहीं बोलत खोटें.

**स्तिफानो**—त्रिंक्युलो, जर याच्या गोष्टीमध्यें असा त्रास दिलास तर, याच हातानें पहा बत्तीशी पाडून हातावर देईन.

**त्रिंक्युलो**—हें काय रे बुवा, मी तर एक शब्दही बोललों नाहीं!

**स्तिफानो**—चुप तर. एक शब्द देखील बोलूं नकोस. [क्यालिबनास] चालूं दे रे पुढें तुझें.

**क्यालिबन**—मी ह्मणतों तसेंच, चेटकानेंच त्यानें हें बेट मिळविलें. माझ्याच पासून त्यानें हें घेतलें. आतां आपण बडे माणुस जर कांहीं त्याचा सूड उगवाल तर आहे; कारण मला माहित आहे कीं, हें काम करण्याचें धैर्य आपल्या आंगीं आहे; हें भित्रें बसलें आहे ह्याच्या हातून नाहीं व्हावयाचें.

**स्तिफानो**—हें तर अगदीं खचितच.

**क्यालिबन**—मग या बेटाचे राजे आपण व्हाल, आणि मी आपली चाकरी करीन.

**स्तिफानो**—पर ही गोष्ट कशी तडीस जाईल? या इसमाची कें आमची तुला गांठ घालून देतां येईल?

**क्यालिबन**—हो हो; जी महाराज; त्यास झोंपीं गेलेला देखील मी तुमच्या हातीं सांपडवीन, आणि मग तुह्मी त्याच्या डोचक्यांत खिळाच ठोका.

**एरियल**—खोटेंच सांगतोस तूं. तुझ्या हातून हें कांहीं एक व्हावयाचें नाहीं.

**क्यालिबन**—कोणरे हे विचित्र गयाळी! कायरे विद्या

यला काय नुसतें समुद्राचेंच खारें पाणी; दुसरें कांहीं मिळायाचें नाहीं. कारण मी कशास त्यास दाखवितों गोड्या पाण्याचे झरे कोठें आहेत ते!

**स्तिफानो**—त्रिंक्युलो, आतां आपला जीव जास्ती धोक्यांत घालूं नकोस. एक शब्द जास्ती बोलून जर ह्या राक्षसास चिडविशील तर, ह्याच हातानें, मायाबिया चट सारी दवडवून, तुझी चटणीच करून टाकीन.

**त्रिंक्युलो**—कायरे बुवा! मीरे काय केलें! मी तर आपला उगांच बसलों आहें. मी आपला येथून दूर जातों कसा.

**स्तिफानो**—तूं ह्यास, लबाड बोलतोस, ह्मणून नाहीं कां ह्मणालास?

**एरियल**—तूं पर खोटें बोलतोस.

**स्तिफानो**—खोटें बोलतों काय मी? घे तर घे हें तूं. [त्यास मारतो.] तुला ह्याचीच हौस असली तर ह्मण पाहूं आणखी एकदां मी लबाड बोलतों ह्मणून.

**त्रिंक्युलो**—ह्मटलें कोणी लेकांनीं पण, तूं खोटें बोलतोस ह्मणून!—एहेरे! अक्कल तर गेलीच, पण कानही गेले कां?—मेली तुझी बाटली मरे आईनें! पहा कसें दारू पिण्यानें होतें तें. किडे पडोत त्या तुझ्या राक्षसाला आणि तुझीं बोटें भुतें खावोत कशीं तीं!

**क्यालिबन**—हः हः हः.

**स्तिफानो**—आतां चालूंदे रे तुझी गोष्ट. पण जरा पलीकडे उभा रहा.

**स्तिफानो**—हो रे तूं पलीकडे.—चल, चालूं दे तुझी गोष्ट पुढें.

**क्यालिबन**—मीं आपणांस सांगीतलेंच आहे कीं, दोन प्रहरीं त्याचा झोंप घेण्याचा पाठ आहे; तेव्हां तुह्मी अधीं त्याचीं पुस्तकें हाताखालीं घाला आणि मग त्याचा मेंदूच बाहेर काढा; किंवा एकादा बडगा घेऊन त्याचें टाळकें फोडा.–नाहींतर एकादा खुंटा घेऊन त्याचे पोटांत ठोका. किंवा या तुमच्या चाकूनें त्याचें नरडें कापा. पण पहिल्यानदां पुस्तकें हस्तगत करण्याचें खुप लक्षांत ठेवा; कारण त्याचीं तीं पुस्तकें गेलीं ह्मणजे तो झाला ढेकूळ माझ्यावाणी; आणि मग अम्मल चालविण्यास एकही भूत त्याजपाशीं राहणार नाहीं; कारण ज्याप्रमाणें माझा त्याच्याशीं उभा दावा आहे, त्याप्रमाणें त्या सर्वांचाही आहे. ह्याचीं पुस्तकें तीं तेवढीं जाळा ह्मणजे झालें. तो ह्मणत असतो कीं, माझीं पुस्तकें माझीं महासाधन हत्यारें आहेत; आणि कोठें घर त्यास सांपडलें कीं तेथें तीं येऊन पडलींच. पण त्याच्या मुलगीचें रूप सर्व गोष्टींहून मोठें ध्यानीं आणण्या सारिखें आहे. तोच तिला अनुपम सुंदरी असें ह्मणत असतो. मीं तर साऱ्या जन्मांत, माझी ह्मातारी सायकोराक्स आणि ही, ह्यांच्या शिवाय तिसरी बायको ह्मणून डोळ्यानें पाहिलीच नाहीं; परंतु म्हातारीच्या आणि हिच्या स्वरूपामध्यें जमीन अस्मानाचा फरक आहे.

**स्तिफानो**—काय म्हणतोस त्याची पोर अशी सुंदर आहे एकूण!

**स्तिफानो**—राक्षसा, तूं सांगतोस त्या माणसास मी खास मारीन. त्याची मुलगी व मी या बेटाचे राजाराणी होऊं. या इलाही! उमर दौलत जादा!–त्रिंक्युलो आणि तूं या दोघांस मी वजीर बनवीन!–कायरे त्रिंक्युलो, तुला हा बेत कसा काय आवडतो.

**त्रिंक्युलो**—लई नामी.

**स्तिफानो**—आण इकडे तुझा हातांत हात. मीं तुला मारल्याचें मला आतां वाईट वाटतें. पण जोंपर्यंत जिवांत जीव आहे तोंपर्यंत आपली जीभ संभाळ हो.

**क्यालिबन**—आतांपासून अर्ध्यातासांत त्यास गाढ झोंप लागेल. तुम्ही त्याला मारणारना पण?

**स्तिफानो**—होय, इमानेइतबारें सांगतों तुला.

**एरियल**—[मनांत] आतां ही गोष्ट मी आपले धन्यास जाऊन सांगतों.

**क्यालिबन**—तुम्हीं तर, बुवा, मला आतां खुष करून सोडिलें! माझे पोटांत आनंद मावत नाहीं. करूं या तर आतां ग़मत. मला नुकतेंच जें गाणें तुम्हीं शिकविलें तें म्हणाना पुन्हां.

**स्तिफानो**—अरे राक्षसा, करण्यासारिखें असल्यास मी तुझा शब्द कधीं मोडणार नाहीं. चल येरे त्रिंक्युलो ये, आपण गाणें गाऊं [गातो.]

"बोलानी डोलानी, डोलानी बोलानी,
"मन मानी तोची तार."

**क्यालिबन**—हें नव्हे तें गाणें.

[ एरियल तबला सारंगीवर तेंच गाणें वाजवितो. ]

**स्तिफानो**—काय आमचेंच नव्हे काय हें गाणें पुन्हां!

**त्रिंक्युलो**—मला वाटतें आमचें गाणें तें "निनामी" वायुरूपी गृहस्थ, त्यांनीं हें वाजविलें.

**स्तिफानो**—जर तूं वाजविणारा हा कोणी मनुष्य असशील तर तसाच प्रगट हो, आणि जर भूत असशील तर तुझ्या इच्छेस येईल तें रूप घेऊन असा समोर ये.

**त्रिंक्युलो**—अरे बाप! सर्व पापांची माफी असो. इडापिडा टळो.

**स्तिफानो**—जो एकदां मेला तो सर्व देण्यापासून सुटला, म्हणून मी तुझी कांहीं भीति बाळगीत नाहीं. ईश्वरा खैर कर!

**क्यालिबन**—काय तूं भ्यालास?

**स्तिफानो**—नाहीं राक्षसा, मी नाहीं भ्यालों.

**क्यालिबन**—असा भिऊं नकोस तूं. या बेटामध्यें अशा प्रकारचे आवाज, आनंद वाटण्यासारखे सूर आणि रागदाऱ्या पुष्कळ हमेशा ऐकूं येतात. पण त्यांपासून कांहीं इजा होत नाहीं. [केव्हां केव्हां हजारों तुनतुन करणाऱ्या वाद्यांचे नाद माझ्या कानाभोंवतीं गुणगुण करितात, आणि केव्हां केव्हां असे मंजुळ शब्द कानीं येतात कीं, मी जरी पुरी झोंप घेऊन उठलों असलों तरी, त्यांच्या योगें पुन्हां झोंप येते. आणि झोंपेंत स्वप्न पडून मला असें वाटूं लागतें कीं, जसे कांहीं ढग उलताहेत व त्यांमधील असंख्य मौल्यवान पदार्थ माझ्या आंगावर आतां पडतीलच. मग जेव्हां मी जागा होतों त्यावेळेस असें स्वप्न पुन्हां पडावें म्हणून मी रडत हळहळत बसतों.]

**क्यालिबन**—पण प्रास्पेरो जेव्हां मरेल तेव्हां सर्व हे.

**स्तिफानो**—तें काम तर आतांच करून टाकलें म्हण. त्या गोष्टीची आठवण मला आहेच.

**त्रिंक्युलो**—तो आवाज तर आतां निघून जात आहे. अधीं त्याचेच मागें लागूं आपण, आणि मग तें आपलें काम करूं.

**स्तिफानो**—राक्षसा, चल तूं पुढें, आणि तुझ्यामागून मी येतों. हा गीत वाजविणारा नजरेस पडेल तर फार नामी होईल! त्यानें आतां गाणें तर बंद केलें.

**त्रिंक्युलो**—काय जणू, येऊं ह्मणतोस! आलों तर स्तिफानो तुझ्या मागून.

अंक ३ रा. प्रवेश २ रा समाप्त.

---

## अंक ३ रा.

### प्रवेश ३ रा.

**स्थल**—बेटावरील आणखी दुसरा भाग.

[आलोंझो सिबाश्चियन, आन्तोनिओ, गोंझालो, एद्रियन, फ्रान्सिस्को वगैरे येतात.]

**गोंझालो**—देवीशपथ आतां मला पुढें एक पाऊल टा-कायाची देखील शक्ति राहिली नाहीं. [ माझीं ह्मातार्‍याचीं हाडें सर्व ठणकायास लागलीं आहेत. जसें व्यूहांतून चा-

**आलोंझो**—पुरातन मानकऱ्या, तुला कांहीं दोष देतां येत नाहीं. मीही थकून केवळ हतवीर्य झालों आहें. बैस तर खालीं आणि कांहीं विसावा घे. [हांजीहांजी करणारासही कांहीं बोलण्यास जागा न राहील अशी मीही आपले मुलाची आशा येथेंच सोडून बसतों; ज्याचा शोध करण्याकरितां आम्ही असे रानावनांतून फिरतों, तो खचित बुडून समुद्रांत पडला आहे; आणि आम्ही निरर्थक जमिनीवर शोध करितों, ह्मणून ह्या समुद्रास आमचे विफल प्रयत्न उपहासास्पद वाटत असतील.] असो जाऊं द्या त्याला!

**आन्तोनिओ**—[सिबाश्चियनाचे कानांत] हा असा निराश झालासा पाहून मला फार आनंद होतो. जें कृत्य तडीस नेण्याचा तूं विचार केला होतास त्या कामीं क्षणभर देखील *निश्चयास* ढळूं नकोस.

**सिबाश्चियन**— [आन्तोनिओचे कानांत] आतां जेव्हां पुन्हां अनुकूल प्रसंग येईल तेव्हां काम फत्ते करून टाकूं.

**आन्तोनिओ**—[सि० चे कानांत] तें आज रात्रीसच करूं; कारण आतां हे प्रवासाच्या कष्टानें केवळ त्रासून गेले आहेत; ह्मणून, ताजेतवाने असल्याप्रमाणें, ह्यांचे हातून आज नीट सावधगिरी ठेववणार नाहीं, व ठेवण्याची इच्छाही त्यांस होणार नाहीं.

**सिबाश्चियन**—[आं० कानांत] आज रात्रीच ह्मणतोस. उगेच जास्ती कशास बोलतोस!

[गंभीर आणि चमत्कारिक गायन चालतें, आणि

कांहीं चेष्टा करीत करीत नाचतात आणि राजा वगैरे यांस जेवावयास निमंत्रण करून निघून जातात. ]

**आलोंझो**—हें संगीत कोठचें ऐकूं येत आहेहो? सुमित्रहो, ऐका तरी तुह्मी.

**गोंझालो**—वहावा! किती मधुर हें गायन.

**आलोंझो**—हे भगवन्, आमचें संरक्षण करण्यास बळकट दूत पाठीव,—हे हो कोण विजातीय आले?

**सिबास्त्रियन**—हा तर प्रत्यक्ष चालताबोलता गारोड्याचा तमाशाच आहे. [आतां मी एकशृंग प्राणी आहेत असें जे म्हणतात तें खरें मानीन, आणि आरबस्थानांत फिनिक्स नामक पक्ष्याचें सिंहासन म्हणून एक झाड आहे, व प्रत्यक्ष आज काल तेथें एक फिनिक्स पक्षी राज्य करीत आहे असें जे म्हणतात तें देखील खरें मानीन. ]

**आन्तोनिओ**—आतां या दोनीही गोष्टी मीं सप्रमाण मानीन; आणि [जर] दुसरी एकादी अशीच कांहीं विश्वास न वाटण्यासारिखी कथा असली तर ती आणा मजपुढें आतां, कीं, ती सत्य आहे म्हणून लागलीच मी वाहतों शपथ: प्रवाशी एकूण कांहीं खोटें लिहित नाहीत. मग त्यांस भले घरकोंबडे लोक बढाईखोर म्हणून दोष देवोत. ]

**गोंझालो**—अहो, नेपल्स शहरांत मीं जर हीं आतांचीच गोष्ट सांगितली तर, ती कोणी खरी मानील काय? जर मीं तेथें म्हटलें कीं, मीं अशा अशा प्रकारचे बेटांत राहणारे लोक पाहिले आहेत, तर कोणास खरें वाटेल हो? आणि

पहा यांची चालचलणूक, ती आमच्या मानव जातींतील, पुष्कळांपेक्षां किंबहुना सर्वांपेक्षांही सभ्य दिसते.

**प्रोस्पेरो**—[आपणाशीं] हे प्रामाणिक मानकऱ्या, तूं जें बोललास तें सत्य आहे. कारण या तुमच्याच मंडळींत सध्यां असे कांहीं दुष्ट आहेत कीं, ते या भुतांसही बरे ह्मणवितील.

**आलोंझो**—मी तर या चमत्काराचा जितका विचार करितों, तितका थोडाच. काय यांचीं स्वरूपें! काय नाचणें! आणि काय आवाज! आणि वाचेचा संस्कार नसतांही मुक्या मुक्यानेंच समजून सर्व व्यापार करण्याची काय यांची शैली!

**प्रोस्पेरो**—[आपल्याशीं] झाली तर आमची ही समाप्तीच्या वेळची शिफारस. चलावें तर आपण आतां. [सर्व भुतें नाहींशीं होतात].

**फ्रान्सिस्को**—मोठ्या चमत्कारानेंच हे सर्व कोठच्या कोठेंच गेले!

**सिबास्टियन**—कांहीं चिंता नाहीं, गेले तर जाऊं द्या त्यांना. त्यांनीं आपले थाळे तर मागें आपणासाठीं ठेविलेच आहेत. आणि आपणा सर्वांस भुकाही लागल्याच आहेत,—महाराज, आपली कांहीं यांस बोट लावण्याची इच्छा आहे काय?

**आलोंझो**—आपण नाहीं बुवा यांस शिवणार.

**गोंझालो**—खरोखर, महाराज, येथें आपणास भिण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं. अहो आपण जेव्हां लहान पोरें

खरें वाटत होतें काय? किंवा ज्यांची डोकीं छातींत गडलेलीं असे लोक आहेत ह्मणून तरी खरें वाटत होतें काय? परंतु आतां हेंच पाहून, ही गोष्ट खरी आहे ह्मणून सर्व पैजवाले पैज देखील मारतील कीं नाहीं!

आलोंझो—मी करितों तर तयारी. आणि जरी मेलों तरी चिंता नाहीं. यांतील कांहीं अन्न भक्षण करितोंच. मरण्याचें आतां काय! ज्याकरितां जगावें तें तर गेलेंच.—दादा, आणि अहो डयूकमहाराज तुह्मी ही, व्हा तयार, आणि उचला आमचा कित्ता.

[विजा चमकून मोठे गडगडाट होतात. एरियल गृध्राचें स्वरूप घेऊन येतो, आणि थाळे मांडलेल्या मेजावर मोठ्यानें पंख फडफडावतो; आणि विलक्षण रीतीनें थाळे सर्व नाहींसे होतात.]

एरियल—तुह्मी तिघे पापपुरुष आहात; ह्मणून नाशाची देवता, जिचा अम्मल सर्व या पातालावर व या पातालांत जें सर्व आहे त्याजवर चालतो, तिनें, ज्या समुद्रास अजीर्ण ह्मणून कधींच कशाचेंच होत नसतें, त्या समुद्राकडूनही तुह्मांस शासन करावें ह्मणून या निर्जन बेटावर पुनश्च ओकून आणविलें आहे, कारण तुह्मी असे पापी आहात कीं, मनुष्यांमध्यें राहण्यास तुह्मी अयोग्य आहात. आतां मीं तुह्मांस येथें वेडेकरून सोडिलें आहे.

[आलोंझो, सिबाश्चियन वगैरे हे तलवारी उपसतात हें पाहून]

त्याच्या वाऱ्यास जखम करितां येईल, किंवा पुनश्च जमणाऱ्या पाण्यास जसें ठार मारण्याचें करवेल, तसेंच माझ्या पंखांतील एक केशाचा नाश करूं ह्मटल्यास आहे. माझे सोबतीही याचप्रमाणें निर्भेद्य आहेत. आणि जरी तुमच्या हत्यारांनीं कांहीं इजा करितां येती तरी, तीं आतां तुह्मांस उचलण्यास शक्ति न होय अशीं जड करून टाकण्याची करामत आह्मांजवळ आहे. परंतु ध्यानांत ठेवा, (कारण माझें काम तुह्मांस केवळ आठवण करून द्यावी एवढेंच आहे,) तुम्ही ध्यानांत ठेवा कीं, तुह्मीं तिघांनीं मिळून सुनीतिमान जो प्रोस्पेरो त्यास मिलन शहरांतून हांकून लाविलें; त्यास आणि त्याच्या गरीब बिचाऱ्या बालकास तुम्हीं समुद्रांत ढकलिलें; त्याचींच फळें आतां तुम्हांस हीं आलीं आहेत. हें जें तुम्हीं अघोर कृत्य केलेंत, त्याची ईश्वरानें तुम्हांस क्षमा न करितां आजपावेतों केवळ घडा भरण्याची वाट पाहिली; आणि आतां समुद्र व भूमी तर काय, परंतु सर्व जगांतील प्राण्यांस तुमचा द्वेष आणून तुम्हांस पीडा देण्याचें त्यानें मांडिलें आहे.—आलोंझो, तुझा तर मुलगाच त्यांनीं हिरावून नेला, आणि मजकडून देवता तुजवर असा शाप वदवितात कीं, जिकडे जिकडे तूं जाशील तिकडे तिकडे तुझे पाठीमागें, कसेंही दुर्घट एकदम मरण आलें तरी त्यास बरा म्हणविणारा, दिवसानुदिवस वृद्धि पावणारा, असा क्षय लागून तुझा नाश होईल. ईश्वरी क्षोभ शांत होण्यास पश्चात्ताप व तद-

[घडघडाट चालले असतां एरियल नाहींसा होतो; तदनंतर मंजुल गात गात विचित्राकृति पुन्हां आंत येतात, आणि नाचत व वेडावण्या दाखवीत मेजें उचलून घेऊन जातात.]

**प्रॉस्पेरो**—[आपणाशीं] एरियला, गिधाडाचें सोंग व त्याची बतावणी तर त्वां उत्कृष्ट केलीस. तुझें स्वरूप कसें खाइन खाईनसें दिसत होतें. माझ्या आज्ञेप्रमाणें बोलण्यास तूं कांहीं कमी केलें नाहींस. व याप्रमाणेंच माझ्या इतर लहानसान किंकरांनींही आपलीं पृथक् पृथक् कामें उत्साहानें व सांगीतल्या बरहुकूम सर्व केलीं. आतां माझ्या महामंत्राचा प्रयोग उत्कृष्ट होत चालला आहे; आणि माझे सर्व शत्रु एकें ठिकाणीं जमून दुःखानें केवळ वेडे होऊन गेले आहेत. ते आतां माझ्या काबूंत सांपडले आहेत, त्यांना अशा दुःखावस्थेंतच ठेवून मी फर्दिनांद, (जो बुडाला असें ते समजतात) व त्याची प्रियतमा आणि माझी प्रिय पुत्री, जी मिरांदा, या उभयतांस भेटण्यास जातों.

**गोंझालो**—अहो तुम्हांस महापवित्र ईश्वराचीच शपथ आहे, तुम्ही असे वेडे कावरेबावरे होऊन पहात उभे कां राहता, तें सांगा.

**आलोंझो**—शिव, शिव! तें केवढें दुष्कर्म, तें केवढें दुष्कर्म! जेव्हां लाटा तुफान चालूं लागल्या तेव्हां माझे दुष्कर्माचा त्या घोष करीत आहेत, असें मला वाटलें; आणि वाराही त्याच गोष्टीची गुणगुण माझे कानांत करीत होता. गंभीर

प्रलयदुंदुभीसदृश ज्याचा ध्वनि असे तें जें विजेचें कडकडणें त्यामधून "प्रोस्पेरो, प्रोस्पेरो" हेच ध्वनि निघत होते. माझ्या दुष्कर्मांचा गजर घडघडाटांत चाललाच होता. या महादुष्कर्मा बद्दलच हा माझ्या पुत्रास समुद्रामध्यें खोल पाण्यांत शय्या मिळाली. मीही आतां जेथें पाण्याचा ठाव कधींच लागला नाहीं, अशा खोल ठिकाणीं समुद्रांत, आपल्या मुलाच्या भेटीस जाऊन त्याचे शेजारींच गाळामध्यें जेथें तो असेल तेथेंच आपला देह ठेवीन [निघून जातो].

**सिबाश्चियन**—एकएकटें भूत जर माझ्या आंगावर येईल तर जरी त्यांच्या फौजाच्या फौजा असल्या तरी त्या कापून काढीन. आतां काय वाईट होणार? जातों त्याची खबर घेण्यास.

**आन्तोनिओ**—मीही तुजबरोबर येतों.

[सिबाश्चियन आणि आन्तोनिओ रागाचे वेडांत निघून जातात.]

**गोंझालो**—हे तिघे तर जिवावर उदार झाले आहेत; म्हणून काय करतील याचा नेम राहिला नाहीं. [बहुत दिवसांनीं उपटणाऱ्या विषाप्रमाणें ह्यांचा महापराध आज ह्यांच्या आत्म्यांस चावचावून घेत आहे.-अहो, मी तुमची प्रार्थना करितों, तुम्हीं तरुण असल्या कारणानें तुमचे हातपाय तुमच्या स्वाधीन आहेत] तुम्ही जलदी करून त्यांच्यापाठीमागें धावा, आणि या वेडामध्यें ते आपणास कांहीं अपाय करून घेतील, तर तो त्यास करूं देऊं नका.

**एड्रियन**—चला हो तुम्हीं सर्व माझ्यामागें. [सर्व निघून जातात.]

तिसरा प्रवेश समाप्त.

अंक ३ रा समाप्त.

[प्रोस्पेरो, फर्दिनान्द आणि मिरांदा येतात.]

**प्रोस्पेरो**—तुला मीं फार कडकपणें शिक्षा भोगविण्यास लाविलें होतें, त्याचे ऐवजीं तुला फळ तर उत्तम करून दिलेंच आहे; कारण, या येथें मीं तुला माझ्या जीविताचा आधारभूत तंतूच अर्पण केला आहे.—ज्या अपत्याकरितां मी जीविताची अपेक्षा करितों तें अपत्य तूंस अर्पण केलें आहे. पुन्हां ही देणगी एकवार तुजवर सोंपवून इचा हात मी तुझे हातांत घालतों. एवढा वेळ जो तुझा मीं छळ केला तो केवळ तुझ्या प्रीतीची परीक्षा पाहण्यास म्हणून केला. तूं ही आपले सत्वास ढळला नाहींस. आतां येथें ईश्वरसाक्ष ही माझी मौल्यवान् देणगी सर्वथैव तुझी झाली असे मी त्रिवार वचन देतों. हे फर्दिनान्दा, कन्यादानाचे वेळीं मीं मोठी बढाई चालविली आहे असें समजून तूं हासूं नकोस. कारण, तुझ्याही अनुभवास येईल कीं ही केलेल्या सर्व स्तुतीस मागें टाकील अशी गुणवती आहे.

**फर्दिनान्द**—एकादे देवानें जरी आपले मताचे उलट मला कांहीं सुचविलें तरी आपण म्हणतां हेंच मी प्रमाण मानीन.

**प्रोस्पेरो**—ठीक; हीस माझी उत्तम देणगी अशी समजून, आणि त्वां योग्य रीत्या संपादन केलेली महालक्ष्मी अशी समजून, इचें ग्रहण कर. परंतु विवाह सर्व परिपूर्ण करणारे विधि यथोक्त शास्त्ररीत्या समाप्त झाल्याशिवाय जर आपण इच्या निरीची गांठ सोडिली, तर तुमच्या विवाहरूप

ऐक्यावर देव सप्रेम आशिर्वाद देऊन त्यास वृद्धिंगत करणार नाहींत. निष्फळ मत्सर व कज्जा आणि दुर्मुखी जो तिरस्कार, यांहींकरून व कुरूप संततीकडून तुमचें विवाहऐक्य शापदग्ध होऊन, तुमचीं अपत्यें तुम्हा उभयतांसही त्रासदायकशीं वाटतील, म्हणून मदनप्रदीप उज्वलित होऊं लागल्यास चांगली खबरदारी घेऊन सावध असा.

**फर्दिनान्द**—मला सुखाचे दिवस आणि संतति पाहण्याची इच्छा आहे, आणि अशा प्रीतीच्या योगानें बहुत कालपर्यंत संसार करण्याची इच्छा आहे, म्हणून मी इच्या संगतीं एकटा जरी एकाद्या अतिशय अंधाराचे गुहेंत असलों, किंवा अशाच दुसऱ्या एकाद्या अनुकूल स्थळीं असलों; आणि कुबुद्धीनें जरी बळकट प्रेरणा केली तरी, मी योग्य वर्तन विसरून अयोग्य वासनेच्या स्वाधीन होणार नाहीं. जो दिवस येण्याची आशा करितात, सूर्याच्या रथाचे घोडे अडखळून मंदगति झाले कीं काय, किंवा रात्रीस कोणी पाताळामध्यें साखळदंडांनीं बांधून टाकिलें कीं काय असा आतुरतेमुळें भास होणार, त्या दिवशींचे सोहाळ्यांत न्यून जिकडून येणार तें मी कधीं करणार नाहीं.

**प्रॉस्पेरो**—नामी उत्तर दिलेंत जावईबुवा; आतां बसा आणि इच्याशीं बोला. आतां ही तुमचीच आहे बरें.—अरे एरिएला, कोठें गेला तो आमचा कष्टाळू चाकर एरियल!

[एरियल येतो.]

**एरियल**—महासमर्थ माझ्या मालकाचा काय हुकूम होत आहे? मी हा हजर आहें.

**प्रॉस्पेरो**—तूं आणि तुझे इतर बारभाई यांनीं मघाची कामगिरी योग्य रीतीनें बजाविली, आणि तशाच कांहीं

कर. कारण या तरुण स्त्रीपुरुषांस माझ्या विद्येचे कांहीं ढंग दाखवावयाचे आहेत. मी कांहीं चमत्कार दाखवीन ह्मणून त्यांस वचन दिलें आहे; आणि हीं उभयतां माझे वचनपूर्णतेची वाट पाहात बसलीं आहेत.]

एरियल—आतांच घेऊन येऊं काय त्यांना?

प्रोस्पेरो—होय. पाप्यास पातें न लागे तोंच.

एरियल—तुम्ही "जा" "ये" असें म्हणून दोन सुस्कारे टाकिता कीं नाहीं, आणि "ठीक, ठीक" असें म्हणण्याचे पूर्वीच प्रत्येक पिशाच वेड्यावांकड्या चेष्टा करीत करीत बोटांवर लीलेनें चालत आलें ह्मणून समजाच. पण मालक, माझेवर आपली मेहरबानी तर आहेना?)

प्रोस्पेरो—माझ्या हुशार एरियला, बहुत मेहरबानी आहे तुजवर. माझी हाक ऐकिल्याशिवाय मात्र येऊं नकोस.

एरियल—ठीक, समजलों सर्व. [निघून जातो.]

प्रोस्पेरो—जावईबुवा, पहा, सत्यास ढळूं नकाहो. [कामचेष्टांच्या स्वाधीन होऊन त्यांस सईल सोडूं नका. कामरूपी अग्नीपुढें शपथा ह्मणजे तृणासमान आहेत. आपल्या लीलांचें संयमन करा; नाहींतर आपल्या प्रतिज्ञेस नमस्कारच झाला समजा.]

फर्दिनान्द—महाराज, मी प्रतिज्ञापूर्वक आपणांस सांगतों कीं, माझ्या अंतःकरणांतील उष्णतेस माझें स्वच्छ शाश्वत जें ब्रह्मचर्यरूप तुहिन तें शमवितेंच आहे.

प्रोस्पेरो—योग्य आहे हें. एरियला, ये तूं आतां, पि-

शाचांचा तोटा पडूं देऊं नकोस. एकादें जास्ती असल्यास चिंता नाहीं. थाटामाटानें दृश्य व्हा; आणि कांहीं गडबड करूं नका. गप्प आतां तुह्मी चित्रासारिखे बघत बसा.

[मंजुल गायन चालतें. सोंगांचा तमाशा सुरू होतो. इरिस इंद्रधनुषा येते.]

**इरिस इंद्रधनुषा**—हे क्षेत्रदेवते, हे अतिउदार बाळे, तुझीं सर्व धान्यांनीं समृद्ध शेतें, तुझे तृणमय पर्वत, ज्यांवर मेषांचे यूथ शतशः चरत आहेत; तुझीं सपाट कुरणें, ज्यांमध्यें पशूंस राहण्याकरितां पर्णकुटिका आहेत; व पवित्र अप्सरांस वेणीमध्यें गुंफण्यास शुचिर्भूत फुलें प्राप्त व्हावींत म्हणून तुझ्या आज्ञेनें वसंतानें पुष्पीकृत व कृषिकर्मांनीं सुशोभित केलेलीं अशीं जीं तुझीं कुरणें; व प्रियांनीं धिःकारल्यामुळें विरहवेदना सोसणाऱ्या जनांस ज्यांची छाया प्रिय अशा ज्या तुझ्या तालवृक्षांच्या राया; तशाच तुझ्या मंडपदार द्राक्षबागा; आणि पाषाणमय समुद्रकांठ इत्यादि जे तुझे विहार करण्याचे प्रदेश, तेथून तुझें आगमन येथें व्हावें म्हणून मी इंद्राणीची द्वारपालिका तुस आज्ञा करीत आहें,—ह्या हिरव्या चार मैदानामध्यें बाईसाहेब बसल्या आहेत, येथें तुझें आगमन व्हावें. पहा या ठिकाणीं बाईसाहेबांचें वहन जें मयूर तो कसा थाटानें उडत आहे!! तर हे संपत्तिमान क्षेत्रपालिके, बाईसाहेबांचें मनोरंजन करण्यास येथें सत्वर तुझें आगमन व्हावें.

[क्षेत्रपालिका येते.]

**सिरिस क्षेत्रपालिका**—गे बहुरागमंडिते देवी, अगे इंद्राणीचे एकनिष्ठ द्वारपालिके, जी तूं आपल्या सकुंकुम पादानें माझ्या फुलांवर मधुवृष्टि करितेस, व तेणेकरून त्यांजवर जशीकाय संजीवनीचीच वृष्टि झाल्यासारिखें होतें, जी तूं

राणीसाहेबांनीं माझी आगमनापेक्षा किमर्थ केली सांग बरें।

**इरिस इंद्रधनुषा**--येथें सत्यधर्माचरण करणाऱ्या स्त्री-पुरुषांची एकभावना झाली आहे. त्यांचा विवाहोत्साह करण्यास, व या धन्य दंपत्यास कांहीं उत्तम आंदण देण्यास तुला बोलाविलें आहे.

**सिरिस क्षेत्रपालिका**--हे स्वर्गवासिनी इंद्रधनुषे [ बाई-साहिबाजवळ या वेळेस विश्वकर्म्याची स्त्री व तिचा पुत्र मदन हीं उभयतां आहेत कीं काय, हें तुला माहीत असल्यास मला सांग. त्या उभयतांनीं मिळून माझे मुलीस फितवून काळ्याबेऱ्या यमाशीं तिचें लग्न लावून दिलें; त्या दिवसापासून मीं तिचे व तिचा आंधळा मुलगा याच्या अपवित्र वाऱ्यास देखील उभी राहणार नाहीं अशी शपथ घेतली आहे म्हणून पुसलें. ]

**इरिस इंद्रधनुषा**--तिच्या भेटीची तूं येथें कांहीं धास्ती बाळगूं नकोस; ती देवी [ढग] कातरीत कातरीत पाताळ देशाकडेस जातांना मीं पाहिली. आणि तिचा पुत्रही [ कपोत-रथांत बसलेला तिच्या बरोबरच होता. ] येथें येऊन या वधूवरांवर कांहीं अप्रशस्त मंत्रप्रयोग करून यांनीं विवाहहोम होण्याचे पूर्वी कोणताही प्रीतीचा व्यवहार करणार नाहीं म्हणून जी शपथ घेतली आहे, ती मोडून टाकावी म्हणून तीं मातापुत्रे येथें आलीं होतीं; परंतु ती मंगळाची नाटिक हतमंत्र होऊन येथून पुन्हां निघून गेली. तिच्या तिरसट मुलानें आपले कुसुमशर रागानें सर्व मोडून टाकिले, आणि

अशी शपथ घेतली कीं आजपासून शरसंधानच मी करणार नाहीं; व केवळ बालस्वभाव धरून कपोतांशीं खेळत बसेन.

**सिरिस क्षेत्रपालिका**—सर्व महाराण्यांमध्यें अग्रेसर ज्या भगवती इंद्राणी त्या इकडे येत आहेत. हें त्यांच्या चालण्यावरून मी जाणतें.

[इंद्राणी येते.]

**जुनो इंद्राणी**—हे उदार भगिनी क्षेत्रपालिके, तुझें कसें काय आहे ? या जोडप्यास सर्व अनुकूल होऊन यांची संतति कीर्तिमान व्हावी ह्मणून यास आशिर्वचन करण्यास मजबरोबर चल.

जुनो इंद्राणी [गाते].

**दिंडी.**

कुबेरापरि संपत्तिमान व्हाल
कीर्त्ति तुम्ही बहु जगीं गाजवाल ॥
पुत्ररत्नें संसारकौतुकाचें
सौख्य भोगा चिरकाल, वचन माझें ॥ १ ॥

सिरिस-क्षेत्रपालिका [गाते].

**साकी.**

॥ भांडारें तव करील धान्यें वसुंधरा परिपूर्ण ॥
॥ पशुशालाही अभावांकें करिल सकल संपूर्ण ॥ १ ॥
॥ बागांतिल तव द्राक्षवल्लरी घोस लडुनि लवतील ॥
॥ फलभारानें फलतरु तैसे नम्र सदा होतील ॥ २ ॥
॥ वसंत देवी त्वरित येउनी शोभा मंडन क्षेत्रा ॥
॥ सर्वकाळ तो वास्तव तेथें करो जना सुखकर्त्ता ॥ ३ ॥
॥ सुकाळ होइल जाणा सकलहि वस्तूंचा सखयांनो ॥
॥ शिरिं विलसो हें आशिर्वचनचि तुमच्या प्रियबाळांनो ॥ ४ ॥

**प्रास्पेरो**—हाय. हीं पिशाच आहेत. माझ्या मनांतले विचार यांनीं माझें हें प्रस्तुत नाटक करून दाखवावें ह्मणून मीं त्यांना त्यांच्या बंदिशाळेतून येथें बोलावून आणिलें आहे.

**फर्दिनान्द**—सर्व जन्मभर माझा वास येथेंच होवो! असे कुशल श्वशुर व अशी गुणपूर्ण स्त्री यांच्या योगें हें स्थल केवळ मला स्वर्गाप्रमाणें भासत आहे.

[ इंद्राणी आणि क्षेत्रपालिका एकीमेकीच्या कानांत बोलतात, आणि इंद्रधनुष्येस कांहीं कामगिरीवर पाठवितात].

**प्रास्पेरो**—प्रियकरानो, तुम्ही आतां उगेच बसा; इंद्राणी आणि क्षेत्रपालिका एकमेकींशीं कांहीं गुप्त मंत्र करीत आहेत, त्यावरून आणिक कांहीं खेळ होणें आहे असें दिसतें. चुप, सर्व गप्प बसा, नाहींतर माझा प्रयोग निष्फल होईल.

**इरिस इंद्रधनुष्या**—नागमोडीप्रमाणें वाहणाऱ्या नद्यांतील अप्सरांनो, ज्यांस नागकन्या अशी संज्ञा आहे, त्या तुह्मी प्रसन्नमुख होत्सात्या डोकीवर लव्हाळ्याचे मुकुट घालून आपल्या खळखळ वाहणाऱ्या प्रवाहांतून निघून हुकुमाप्रमाणें या तृणमय मैदानांत या. इंद्राणीची तुम्हांस अशीच आज्ञा आहे. हे नियमनिष्ठ अप्सरांनो, अनन्य अनुरागयुक्त या दंपत्याचा विवाहोत्साह करण्याकरितां सत्वर तुह्मी आगमन करा.

[कित्येक नागकन्यका येतात.]

अहो भाद्रपदांतलि कष्ट करण्याच्या दिवसांत सूर्यकिरणांनीं काळसर झालेले कृषिकांनो, तुम्ही आपल्या नांगर-

लेल्या शेतांतून येथें या, आणि आज आनंदोत्साह करा. आजचा दिवस सण असा माना; तुम्ही आपल्या वेत्राचे मुकुट डोकीवर घाला आणि या. येथें सुंदर नागकन्यका आल्या आहेत यांचे हातांत हात घालून पौरजनसदृश तांडवास आरंभ करा.) [कित्येक कृषिक असावा तसा पोषाख केलेले येतात; ते व नागकन्यका मिळून उत्कृष्ट नृत्य करितात. नृत्याच्या शेवटीं प्रोस्पेरो एकाएकीं डचकल्यासारिखें करून कांहीं बोलतो, तें ऐकतांच सर्व पिशाचें चमत्कारिक घोगरा आणि अव्यक्त शब्द करीत नाहींशीं होतात.]

**प्रोस्पेरो**—[आपणाशीं]. त्या पशुरूप क्यालिबन मूर्तिपिडानें व त्याच्या साथ्यांनीं माझ्या प्राणघाताविषयीं लुच्चेगिरीची जी एकाचित्तता केली आहे त्याचें मला विस्मरण झालें होतें. त्यांचा लाग साधण्याचा काळ तोच आतां आला आहे.—[पिशाचांस] ठीक तुम्ही सोंगांची बतावणी चांगली केलीत:—आतां येथून निघून जा. एक शब्द जास्ती बोलूं नका.

**फर्दिनान्द**—प्रिये, हें कांहीं चमत्कारिकच आहे. तुझे बापाचे मनास आज कशाचा तरी संक्षोभ झाला आहे. त्याचे त्रास राहून राहून कढ येतात.

**मिरांदा**—आजपर्यंत मीं बाबास असा अनिवार राग आलेला कधीं पाहिला नाहीं.

**प्रोस्पेरो**—जावईबुवा, आपण संभ्रमानें अस्वस्थ झाल्यासारिखे दिसता; परंतु, महाराज, आपली आनंदवृत्ति असूं द्या. आतां आमचे खेळ चट सारे संपले. आमचीं हीं पात्रें सर्व पिशाचें होतीं; म्हणून मीं आपणांस पूर्वींच सांगीतलें. आणि आतां तीं हवेंत जाऊन मिसळलीं, ही जी

अति विलसित जीं राजमंदिरें, तशींच भव्य देवालयें, फार तर काय, पण हें मूर्तिमंत सर्व महाब्रह्मांड व यांतील तत्संबंधी सर्व द्रव्यें, हीं देखील सर्व या आतांच्या वायुरूपी तमाशाप्रमाणेंच नाश पावून विरघळून जाणार ; व याचें कोठें नांवगांव ही नाहीं अशीं होऊन जाणार. सारांश आम्हीं प्राणी केवळ स्वप्नवत् अनित्य आहोंत; आणि मायासागरानें आमच्या अति सूक्ष्म जीवितास गराडा घालून आम्हांस निद्रावस्थेंत ठेविलें आहे.— महाराज! मला उपरति प्राप्त झाली आहे; ह्मणून माझ्या दुर्बलतेचा त्रास करूं नका. माझ्या ह्मातान्याचें या विचारानें माथें फिरून गेलें आहे. माझा असा निरुत्साह पाहून तुम्ही गडबडूं नका. माझे मनांतील उद्वेग जाईपर्यंत मी येथून तेथपर्यंत असा दोनचार फेऱ्या घालतों.

**फर्दिनान्द, व मिरांदा**—आपण जलदच प्रकृतीवर याल अशी आमची आशा आहे.

[उभयतां निघून जातात].

**प्रोस्पेरो**—नांव घेतांच आलास, म्हणून मी तुझे आभार मानितों.— एरियला, ये इकडे.

[एरियल येतो.]

**एरियल**—तुमच्या शब्दांशीं जसा खिळूनच मी राहिलों आहें. काय आपली मर्जी आहे ?

**प्रोस्पेरो**—अरे पिशाचा, क्यालिबमाची गांठ घेण्याची आपणांस तयारी केली पाहिजे.

**एरियल**—होय, माझ्या शास्त्या; जेव्हां क्षेत्रपालिकेस

मीं येथें आणिलें तेव्हांच आपणांस ही गोष्ट सुचविण्याचें माझे मनांत आलें होतें. परंतु न जाणो आपणांस राग येईल म्हणून तसाच बसलों.

**प्रोस्पेरो**—त्या लुच्चा गुलामास तूं कोठें सोडून आलास तें सांग पुन्हा.

**एरियल**—महाराज, मीं आपणांस सांगितलेंच आहे, ते दारू पीपीऊन विस्तवासारिखे लाल पडले आहेत; आणि त्यांस असा आवेश चढला आहे कीं वाऱ्याची झुळुक त्यांचे तोंडावर वाहते म्हणून वाऱ्याशीं पण कज्जा करून त्यासही ते मारीत आहेत. ज्या जमिनीवर ते उभे आहेत ती जमीन पादस्पर्श करिते म्हणून तीस रागानें ते लाथा देत आहेत. असे जरी ते वेडे झाले आहेत तरी, आपणांस मारण्याचा जो त्यांनीं बेत केला आहे, तो तसाच मनांत कायम ठेवून तो सिद्धीस न्यावा म्हणून इकडेसच ते येत आहेत. ते अशा स्थितींत असतां मध्येंच मीं आपली खंजरी वाजविली; ती कानीं पडतांच ज्याप्रमाणें अल्लड तट्टे आपले कान उभारतात त्याप्रमाणें त्यांनीं आपले कान व डोळे वटारिले; नाकें फिंजारिलीं; जसें कांहीं त्यांस गायनाचा वासच कळेल, असे ते पाहूं लागले. त्या वेळेस त्यांचे कानांत मीं मंत्र फुंकिला; तेव्हां ते एकाद्या वासरासारखे माझे चुचकारणें ऐकून दांता सारिख्या तीक्ष्ण कांट्यांच्या झाडांतून, साबरींतून, कुसळांतून आणि सराट्यांतून सर्वांग टोंचलेले फिरफिरून सरते शेवटीं मीं त्यांस आपले गुहेजवळ जो घाण चिखलाचा गारा आहे त्यांत आणून गुंतवून सोडिलें आहे. तेथें पायांस चिखल लागतो म्हणून रागानें त्या घाणेरड्या पाण्यांत सर्वांग भरून जाई अशा उड्या मारीत ते राहिले आहेत.

या चोरांस फसवून धरण्याकरितां त्यांचें मोहजाल पसरूं.

एरियल—गेलों मी गेलों, हा पहा. [जातो].

प्रोस्पेरो—भूत बेटा जन्मभूत, ज्याचे मनावर कांहीं ममतेचा ठसा म्हणून उठणेंच नाहीं. त्यास शिकविण्यास किती तरी मीं मेहनत घेतली; पण ती सर्व व्यर्थ गेली. जसजसा तो मोठा होऊं लागला आहे तसतसा कुरूप तर होत चाललाच आहे. पण त्याचें मनही ज्यास्ती ज्यास्ती विषतुल्य होत चाललें आहे. या सर्वांना असा भक्कम मार आतां देतों कीं त्यांनीं आरडतच बसावें.

[एरियल पोषाखी बुटीदार चकचकीत कपडे वगैरेचा बोजा घेऊन पुन्हां येतो त्यास].

या अशा ओळीनेंच हे कपडे लावीत लावीत चल. [प्रोस्पेरो आणि एरियल अदृश्यरूप धारण करून उभे राहतात. क्यालिबन, स्तिफानो, आणि त्रिक्युलो सर्वांग चिखलानें भरलेले असे येतात.]

क्यालिबन—महाराज, कृपा करा आणि पावलें हळूहळू टाका, आंधळ्या चिचुंद्रीचा देखील आवाज कानीं पडूं नये असें करा; कारण आपण आतां अगदीं गुहेच्या तोंडाशींच आलों आहोंत.

स्तिफानो—अरे राक्षसा, तूं म्हणत होतास कीं ही तुझी गाणारी यक्षिण कांहीं उपद्रव देणार नाहीं, पण तिणें तर आमची वेताळाच्या स्वारीप्रमाणें त्रेधाच करून सोडिली.

त्रिक्युलो—अरे राक्षसा, सर्व माझ्या आंगास घोड्याच्या

मुताची घाण येऊं लागली आहे; आणि माझ्या नाकास तर त्या घाणीची मोठी चिरड आहे.

**स्तिफानो**—मला ही तसेंच झालें आहे: ऐकलेंस काय राक्षसा? जर मी तुजवर रागावलों बिगावलों तर, पहा कसें होईल तें.

**त्रिंक्युलो**—मग कशाचा राक्षस, गेलाच चिरडून ह्मणून समजायाचा.

**कपालिबन**—माझे मायबाप, आपली मर्जी मजवर अशीच आणिक कांहीं वेळ असूं द्या. थोडासा दम खा. तुह्मांस जें आतां इनाम मिळेल त्यापुढें झालेली अडचण कांहींच नाहीं; ह्मणून माझें ऐका आणि हळूंच बोला.-सर्व कसें जिकडेतिकडे मध्यरात्रीप्रमाणें सामसूम आहे.

**त्रिंक्युलो**—पण आमच्या दारूच्या बाटल्या त्या गाऱ्यांत गमावल्या, तें कोणीकडेसच गेलें वाटतें.

**स्तिफानो**—रे राक्षसा, बाटल्या गेल्यानें लज्जा व अपमान झाला तो झालाच; परंतु त्यामुळें अजब तोटाही झाला.

**त्रिंक्युलो**—मी भिजलों याचें मला कांहींच वाटत नाहीं. परंतु बाटल्या गमावल्या याचें फार दुःख होतें. राक्षसा, ही तुझी गरीब यक्षीण पाहिलीस ना कशी ती!

**स्तिफानो**—मी आपली बाटली परत घेऊन येईन आपला. या कामीं पाण्यांत बुडालों तरी चिंता नाहीं.

**कपालिबन**—अहो राजेसाहेब, मेहरबानी करून उगेच जरा बसा. आपण गुहेच्या तोंडाशींच अगदीं आलों आहोंत; कांहीं गलबल न करितां जलद आंत शिरा. आणि हें बेट जेणेंकरून अक्षय तुमचें होईल अशी कांहींतरी शिताफी

योग्य स्तिफानो ! पहा हा कसा आपणांस सुंदर राजपोषाख घालण्यास ठेविला आहे तो.

**क्यालिबन**—अरे मूर्खा, तें पडूं दे तेथें. तें तर एक रकटें आहे.

**त्रिंक्युलो**—वाहावारे बचाराम, चोरबाजारांतील माल जसा आम्हांस ओळखतांच येत नसेल वाटतें.–अहो राजे स्तिफानो!

**स्तिफानो**—अरे त्रिंक्युलो, काढरे तो दोरीवरून झगा. यांच हातानें घेईन बरें म्हटलें तो झगा.

**त्रिंक्युलो**—हा घ्या कीं, महाराज, आपण.

**क्यालिबन**—रक्तपिती होऊन हा मरून जावो वेडझवा! काय हें गोणताव घेऊन याचीच अपरूपाई करीत बसणार तूं? चला, महाराज, अधीं जाऊन त्याचा जीव आपण घेऊं; कारण तो जर मध्येंच जागा झाला तर आपल्या सर्वांगाचे चिमटे घेघेऊन धिरडेंच करून टाकील; आणि आपली चटणी बनवील.

**स्तिफानो**—अरे राक्षसा, तूं बैस गप्प.–का दोरीबया, ही बंडी आमचीच कीं नव्हे; आली ही कशी बंडी आतां दोरीखालीं. बंडे, दोरीच्या केसाचा आणि तुझा वियोग झाला, ह्मणून थोडक्याच दिवसांत आतां तूं टकली बंडी होशील.

**त्रिंक्युलो**—वा! काय खासें बोलणें हें! आणखी सरका-

रास पसंत पडेल तर, नीट आपण असे दोरी दोरीनेंच, शिस्ते शिस्तेनेंच मुंडन करीत चलूं.

**स्तिफानो**—वहावा! ही चेष्टा खुप नामी तूं केलीस, म्हणून मी फार खुष झालों. हा घे पोषाख तुला बक्षीस. या देशाचा जोंपर्यंत मी राजा आहें तोंपर्यंत बुद्धिवान पुरुषांस म्हणून विन्मुख कधींही जाऊं देणार नाहीं. "दोरी दोरीनें व शिस्तेशिस्तेनेंच मुंडन करूं" अं! वा! काय नामी उत्तम कल्पना ही! हा घे आणखी एक पोषाख तुला बक्षीस.

**त्रिंक्युलो**—राक्षसा ये असा; आणि हातावर कांहीं कोरडी माती घाल. आणि हे सर्व पोषाख चल घेऊन.

**कॅयालिबन**—मी याला कांहीं घेणार नाहीं; अशानें आपला वेळ मात्र निघून जाईल आणि मग आपणांस तो मासे बनवून टाकील; किंवा अतिशय चपट्या कपाळाचीं कुरूप माकडें करून टाकील.

**स्तिफानो**--राक्षसा, घे रे हातावर माती: आणि जेथें माझ्या दारूचीं पिंपें आहेत तेथें हीं वस्त्रें नेऊन ठेवण्याचे कामीं मदत कर. जर, "नाहीं होय" करशील तर तुला ह्या राज्याचे हद्दीपार करून देईन, समजलास! ने हे पोषाख तिकडे.

**त्रिंक्युलो**—आणि हे दुसरे पण ने.

**स्तिफानो**—हो, ते आणि हे असे सर्व पोषाख जा घेऊन.

[इतक्यांत पारध्यांचा गलबला ऐकूं येतो. पुष्कळ पिशाचें शिकारी कुत्र्यांचीं रूपें घेऊन येतात, आणि स्तिफानो इत्यादिकांची पिच्छा धरितात. प्रोस्पेरो आणि एरियल कुत्र्यांस अंगावर घालितात.]

**प्रोस्पेरो**—छू, पठाऱ्या, छू!

एरियल—हृप्या, ते तिकडे चालले पहा, रुप्या!

प्रोस्पेरो—बहादर, बहादर! अरे तिकडे गेले. वाघ्या तिकडे, तिकडे ऐक.

[ क्यालिबन, स्तिफानो, आणि त्रिंक्युलो यांस मैदानांत हाकून आणितात.]

[एरियलास] जा, आणि पिशाचांस असा हुकुम कर कीं, यांस चांगले कुटून काढा. आणि यांच्या सांध्यांतून सुक्या वेदना निघतील असें करा. मोठमोठे अवधणे आणून यांच्या शिरा सगळ्या जखडून टाका. आणि चिमटे घे-घेऊन पर्वतावरील मांजराच्या किंवा चित्त्याच्या आंगावर जसे दाट ठिपके असतात तसे दाट यांच्या आंगावर वळ उठवा.

एरियल—ऐका, ते कसे ओरडताहेत!

प्रोस्पेरो—चांगली त्यांची शिकार कर. या घटकेस सर्व माझे शत्रु माझे स्वाधीन आहेत. थोड्याच वेळांत तुझे श्रमांचा शेवट होऊन तुला हवेंत मिसळण्याची परवानगी होईल. गड्या, थोडा वेळ आतां मात्र माझी चाकरी नीट कर.

[ जातात.]

अंक ४ था समाप्त.

---

## अंक ५ वा, प्रवेश १ ला.

स्थळ.—प्रोस्पेरोच्या गुहेपुढील जागा.

[प्रोस्पेरो आपला भारलेला झगा घालून येतो. एरियलही येतो.]

प्रोस्पेरो—माझा बेत आतां सिद्धीस जात आहे. माझे

मंत्र कोठें कच्चरत नाहींत, व सर्व माझीं पिशाचें माझ्या आज्ञेंत आहेत; आणि काळास ज्या गाड्यास लाविलें आहे तो गाडा तो नीट ओढीत आहे. दिवस किती चढला असेल बरें!

एरियल—सहा वाजले, महाराज. आपण म्हणाला होतां कीं सहा वाजतां सर्व आपलीं कामें संपतील.

प्रोस्पेरो—ज्या वेळेस मीं तुफान उद्भविलें त्या वेळेस असें म्हटलें होतें खरें. माझ्या पिशाचा, राजा आणि त्याचे बरोबरीचे लोक यांची अवस्था कशी काय आहे तें सांग.

एरियल—ज्याप्रमाणें आपण हवाला दिला होता, त्याप्रमाणेंच एकेठिकाणीं त्यांस अडकवून ठेविलें आहे. जसें आपण त्यांस सोडून आलात तसेंच ते अजून बसले आहेत. तुमच्या गुहेंत फार वारा येऊं नये म्हणून आसऱ्यासाठीं जी राई लाविली आहे, त्या राईमध्येंच ते सर्व कैद करून ठेविले आहेत; तुम्ही त्यांची सुटका करीपर्यंत त्यांस हलण्या चालण्याची कांहीं शक्ति नाहीं. राजा, त्याचा भाऊ, आणि तुमचा भाऊ, असे तिघे केवळ वेडे होऊन बसले आहेत; आणि बाकीची मंडळी त्यांची ती अवस्था पाहून सर्वस्वी दुःख व शोक करीत बसले आहेत. सर्वांहूनही ज्या मनुष्यास तुम्ही म्हातारा भला मानकरी गोंझालो असें म्हणता, तो तर अतिशयच दुःख करीत आहे. त्याच्या डोळ्यांतील अश्रु त्याचे दाढीवरून टपटप, बोरूच्या पानाच्या वळचणींतून जसे बर्फाचे तुषार पडतात तसे, पडत आहेत. तुमच्या मंत्रांचा त्यांजवर असा कडक अम्मल चालत आहे कीं, त्यांची अवस्था तुम्ही पहाल तर खचित तुम्हांस त्यांची दया आल्यावांचून राहणार नाहीं.

प्रोस्पेरो—पिशाचा, तुलाही असें वाटतें काय?

एरियल—जर, महाराज, मी मनुष्य असतों, तर मला त्यांची दया आली असती खरी.

प्रोस्पेरो—तुलाही दया आली असती ह्मणतोस तर मला ही आलीच पाहिजे. तूं वायुरूपी असतां तुझें अंतःकरण जर कळवळलें, तर मी तर त्यांचेप्रमाणेंच मनुष्य आहें, व त्यांचे प्रमाणेंच मला राग, लोभ इत्यादि सर्व मनोविकार आहेत, तर त्यांची मला तुजपेक्षां जास्ती माया कशी नाहीं येणार? त्यांनीं जें मजशीं कपट केलें त्या कपटानें जरी माझा अंतर्याम जळला आहे, तरी मी आपला राग शांतवून उदारपणासच अनुसरतों. सूड उगवावा त्यापेक्षां उपकार करावा ह्यांत विशेष पुण्य आहे. जर त्यांस केलेल्या पातकाचा पश्चात्ताप होईल तर तेवढ्यानेंच माझ्या रागाची शांति होईल. जा, एरियला, त्यांची सुटका कर. माझ्या मंत्राचा मी उतारा करून त्यांचीं सर्व इंद्रियें नीट वृत्तीवर आणून ठेवितों, आणि ते पुन्हां पहिल्यासारिखे भानावर येतील असें करितों.

एरियल—तर आणितों मी त्यांस आतां इकडे. [जातो.]

प्रोस्पेरो—हे पर्वतवासी, जलवासी, सरोवासी, आणि वनवासी भूतांनो; अहो सागरास ओहटी लागली ह्मणजे जमिनीवर पाय न उमटविता सागरदेवाच्या मागून जाणाऱ्या व भरतीच्या वेळेस पुन्हां परत येणाऱ्या इतर भूतांनो; आणि अरे तुम्ही अर्धवेड्यांनो, जे तुम्ही चांदण्यारात्रीमध्यें मैदानांत कडू हरळीचीं कुंडलाकृति चक्रें बनवितां, व जीं चक्रें शेळ्या ह्मणूनच कधीं खात नाहींत, त्या भूतांनो; आणि चांदण्यामध्यें श्वानछत्रें करण्याची ज्यांस हौस, व रात्रीचा गंभीर घंटाध्वनि ऐकण्याची ज्यांना हौस अशा

अन्य भूतांनो, जरी तुम्ही स्वतः पराधीन व निर्बल आहांत, तरी तुमच्याच सहाय्यानें मीं कडकडीत दोन प्रहरचा सूर्यही कधीं कधीं झाकून टाकिला आहे; व जबरदस्त वाऱ्यावर केव्हां केव्हां अम्मल चालवून हरित वर्ण जो समुद्र आणि श्यामवर्ण जें आकाश यांच्यामध्यें, लढाईची छाया आणिली आहे:- मोठ्या भयंकर घडघडाटास मीं अग्नि सहाय्य देऊन इंद्राचें आयुध जी विद्युल्लता तिच्याच योगें त्याचेच नंदन वनांतील महान् महान् ओक झाडें यांसही फोडून काढिलें आहे; आणि सरलद्रुम व देवद्रुम यांस त्यांच्या महान् महान् मूलांसकट उखडून टाकिलें आहे. माझ्या आज्ञेनें कबरस्थानांतून गाडलेलीं शवें पुन्हां जागृत होऊन माझ्या महामंत्राच्या योगें थडगीं उलून बाहेर पडलीं आहेत. परंतु या अप्रशस्त मंत्रविद्येचा आज शपथ घेऊन मी त्याग करितों. आणि मला आतां यांच्या इंद्रियांवर कांहीं मंत्रप्रयोग करावयाचा आहे, त्यांस उत्तम स्वर्गीतील गायनाची अवश्यकता आहे. तें गायनकार्य झाल्यावर, माझा हा भारलेला त्रिशूल मी मोडून टाकून जमिनींत कित्येक पुरुषपर्यंत खोल गाडून टाकितों. आणि माझी पोथी समुद्रामध्यें जेथें कधींच ठाव लागला नसेल अशा जागीं बुडवून टाकितों.

[गंभीर गायनास सुरुवात होते. एरियल पुन्हां आंत येतो. त्याचे मागून वेडेचार करित, व अवळ गोंझाले आहे असा, आलोंझो येतो. व तसेच सिबाश्चियन आणि आन्तोनिओ वेडेचार करीत येतात. व त्यांचे बरोबर एड्रियन आणि फ्रान्सिस्को येतात. प्रोस्पेरोनें वर्तुलाकृति तयार केलेले जागेत ते येऊन सर्व मंत्रबद्ध होत्साते उभे राहतात. हें पाहून प्रोस्पेरो त्यांस म्हणतो.]

**प्रास्पेरो**—भांबावलेल्या मनास उत्कृष्ट औषधच असें जें गंभीर गायन, त्याच्या योगें तुमच्या डोक्यांतील मगज, ज्याचा आतां कांहीं उपयोग नसून ज्यास तुमच्या कपाळामध्यें उष्णतेनें कढ मात्र येत आहेत, तो शुद्ध होवो! तेथेंच तुम्ही उभे राहा; कारण मंत्रानें तुम्ही केवळ बांधलेले आहांत. हे पवित्र गोंझालो, हे सुमनुष्या! तुझ्या डोळ्यांत अश्रु पाहून माझ्याही डोळ्यांस पाणी येत आहे. मंत्राचा अम्मल तर झपाट्यानें उतरूं लागला आहे आणि ज्याप्रमाणें रात्रीच्या अंधाराचा नाश प्रभातकालच्या किरणांनीं होतो, त्याप्रमाणें त्यांचीं इंद्रियें, त्यांच्या बुद्धिरूप ज्ञानास वेष्टून टाकणाऱ्या वेडगळ कल्पनांधकाराचा नाश करून, पुन्हां प्रकृत्यापन्न होऊं लागलीं आहेत.—अरे माझ्या गोंझालो, तूंच माझा खरा बचाव केलास; आणि ज्याचा तूं आश्रय करितोस त्याच्याशीं तूं असाच केवळ एकनिष्ठेनें वागणारा, त्या तुझे उपकार आज मी माझे येथें कायावाचेकरून फेडीन. अरे आलोंझो राजा, तूं मजवर व माझ्या मुलीवर मोठा गहजब केला होतास; परंतु तुझ्या भावानें तुझ्याहीपेक्षां दुष्कर्मांमध्यें अधिक प्रवीणता संपादिली आहे. अरे सिबाश्चियना, आतांच तुला ज्या सर्वांगास चिमटे बसल्याप्रमाणें वेदना होत होत्या, त्या तुझ्या दुष्कर्मास केवळ शासन म्हणूनच होत होत्या. अरे माझ्या पाठीस पाठ लावून आलेल्या भावा, तूं तर आपले हृदयांतून दुर्घट लोभ सांठवून पश्चात्ताप व दया यांस तेथून काढून दिलेसच. तूं आणि सिबाश्चियन (म्हणूनच सिबाश्चियन यास अतिदुःखकारक वेदना सोसाव्या लागत आहेत,) मिळून येथें राजास मारून टाकिलें असतें; परंतु तुम्ही जरी असे उलट्या काळजाचे आहांत, तरी मी तुम्हांस क्षमा करि-

तों.—यांची ज्ञानशक्ति वाढूं लागली असें वाटतें, आणि आतां दुसरी ज्ञानलहरी येईल तिच्या योगें, जितकें ज्ञान असावें तितकें येऊन, आतां, जी तमोमयी घाण पडली आहे ती नाहींशी होईल असें वाटतें.—यांतील एकही पण मजकडे पाहात नाहीं व मला ओळखीत नाहीं.—एरियला, गुहेंतून माझी टोपी व तलवार इकडे घेऊन ये. मी आपला वेष पालटून मिलन येथें गादीवर असतांना जसा पोषाख करीत होतों तसा करून यांस ओळख देतों:—अरे पिशाच्चा, ये इकडे जलद. तुझी सुटका तर आतां अल्प कालांतच होईल.

[एरियल गात पुन्हां येतो, आणि प्रोस्पेरोस पोषाख घालण्यास मदत करितो.]

**एरिएल**—[गातो] गज़ल [राग जिल्हा.]

|| मधुकरि मधु प्राशी पुष्प कर्णीतून ||
|| तिच्यासवें मी हि तेथ मधु हो पिऊन ||
|| घुघु पुष्पशय्येंत आतां स्वस्थ कीं निजून ||
|| घुघु आरडतां त्यांतचि लपुन बसून ||
|| मुक्ति झालि आतां मजा करिन मी हंसून || १ ||
|| वाघुळाच्या पाठिवरी स्वारि हो करून ||
|| वसंताच्या मागमागें आनंदें फिरून ||
|| त्यांचिवरिल मंजरिच्या खालिं कीं रमून ||
|| चैनचान यथासांग करिन मी हंसून || २ ||

**प्रास्पेरो**—हें ठीक आहे. माझ्या कुशल एरियला, तुझी वारंवार आठवण होईल खरी, तरी मी तुला मोकळीक देतोंच. ठीक, ठीक, ठीक. अशाच अदृश्यरूपानें राजाच्या जहाजावर जा; तेथेंच तुला सर्व खलाशी अंबरांत स्वस्थ निजलेले आढळतील; एक तांडेल व एक नावाडी मात्र जागे आहेत, त्यांस कसें तरी येथें घेऊन ये. मेहरबानी करून जलद मात्र आण हो त्यांस.

आणि संभ्रम, यांचाच केवळ वास आहे. या भयंकर प्रदेशांतून देव आम्हांस एकदां बाहेर काढो!

**प्रोस्पेरो**—महाराजसाहेब, ज्याचा बहुत छळ केलात, असा जो मिलनचा ड्यूक प्रोस्पेरो, तो हा मी येथें आलों आहें पहा. मी खरोखर जिवंत तोच ड्यूक आहें, अशी तुमची जास्ती खात्री व्हावी म्हणून मी आपणांस आलिंगन देतों. व आपणांस आणि आपल्या बरोबरच्या लोकांस मी आपले आगमनानें मनापासून बहुत आनंदी झालों आहें असें सांगतों.

**आलोंझो**—तूं खरोखरीच तो मिलनचा ड्यूक आहेस किंवा एकादें क्षुद्र भूत असून, ज्याप्रमाणें थोडक्या वेळापूर्वींच भूतचेष्टांनीं माझी विटंबना केली, तशीच पुनरपि करण्यास आला आहेस, हें कांहीं मला समजत नाहीं. परंतु तुझी नाडी रक्तमांसाच्या माणसाप्रमाणेंच वाहात आहे, आणि तुला पाहिल्यापासून माझे मनाची वेदनाही कमी होऊं लागली; मला वाटतें एवढा वेळ मी कांहीं भ्रमांत होतों; पण जर ही कांहीं पिशाचचेष्टा नसेल, तर ही गोष्ट मोठी चमत्कारिक खरी. तुझें राज्य मी आतां तुला सोडून देतों; आणि जो मीं तुझा छल केला त्याची तूं मला क्षमा कर, अशी माझी तुजपाशीं विनंती आहे. पण प्रोस्पेरो कोठचा हो आतां जिवंत असणार? आणि तो या बेटांत हो कोठचा येणार?

**प्रोस्पेरो**—[गोंझालोस] हे उदार वृद्ध मित्रा, पहिल्या-






**गोंझालो**—हा प्रॉस्पेरो आहे किंवा कोणी पिशाच आहे अशी मला शपथ घेण्यास सांगितल्यास मी तर बुवा घेणार नाहीं.

**प्रॉस्पेरो**—या बेटांतील कांहीं चेष्टांचा अझूनही तुमच्यांवर अम्मल आहे, ह्मणून अझून तुह्मांस खरें वाटणार नाहीं.–माझ्या सर्व मित्रांनो, तुह्मां सर्वांस स्वागत असो :— (एकीकडे सिबाश्चियनास व आन्तोनिओस ह्मणतो.) पण अहो, तुह्मी जोडीचे सरदार, जर मला वाटेल तर यावेळेस महाराजांची इतराजी आपणांवर मी करूं शकतों; तुह्मी दोघे राजद्रोही आहात हें येथेंच सिद्ध करून देतां येईल; खरेंच सांगतों, यावेळेस मी पोकळ गप्पा सांगत नाहीं.

**सिबाश्चियन**—(आपल्याशीं) काय याच्या तोंडांतून भूतबीत तर बोलत नाहीं!

**प्रॉस्पेरो**—भूत नव्हे हो–अहो महादुष्ट राजश्री, तुह्मांस मीं भाऊ ह्मटल्यास माझे तोंडास किडेही पडतील, असें जरी आहे तरी, सर्व महापराधांची मी तुह्मांस क्षमा करितों. माझें राज्य मात्र आतां मला द्या, येथें "नाहीं होय" ह्मणून कांहीं आतां चालावयाचें नाहीं.

**आलोंझो**—जर तूं खचित प्रॉस्पेरोच असलास तर, तूं आजपर्यंत कसा वांचलास तें सांग : या बेटावर आमचें जहाज फुटून तीन तास झाले न झाले, इतक्यांत तूं आह्मांस कसें गाठलेंस; येथें आमचें एक रत्न हरपलें–ती आठवण झाली म्हणजे हृदय कसें घायाळ होतें!–माझा मुलगा फर्दिनान्द हा येथें बुडून मेला.

**प्रोस्पेरो**—हें ऐकून मला बहुतच दुःख वाटतें.

**आलोंझो**—दुर्निवार्य घाला हो हा; आणि येथें कोणाचा कांहीं उपाय नाहीं, ह्मणून समाधान करून स्वस्थ बसलें पाहिजे.

**प्रोस्पेरो**—मला वाटतें आपण समाधान जसें करून घ्यावें तसें घेतलें नाहीं: असाच मजवरही प्रसंग आला आहे; पण समाधानापासून, राज्यादिकांपासून होणाऱ्या मदतीप्रमाणें, मला मदत झाली, व मी आतां स्वस्थ झालों आहें.

**आलोंझो**—काय, तुम्हांवरही कांहीं असाच प्रसंग गुजरला?

**प्रोस्पेरो**—जसा आपल्यांवर प्रसंग गुजरला तसाच मजवरही गुजरला आहे; आणि आपलेजवळ दुःख सोसण्यास जसीं इतर सुखसाधनें आहेत तसीं मजपाशीं नाहींत;-महाराज माझी मुलगी गमावली!

**आलोंझो**—तुमची गमावली। अरे ईश्वरा! हीं दोघें राजाराणी होऊन नेपल्स शहरांत राज्य करण्यास असतीं तर किती सुख झालें असतें! त्या उभयतांनीं राज्य करून माझा मुलगा जेथें समुद्रामध्यें चिखलांत पडला असेल तेथें मी जरी पडतों तरी बरें होतें. आपली मुलगी केव्हां गमावली?

**प्रोस्पेरो**—हें नुकतेंच वादळ झालें त्याच सपाट्यांत. हे मानकरी ह्या भेटीच्या प्रसंगानें चकित होऊन आपले बुद्धीचा ऱ्हास करून टाकीत आहेत आणि आपले डोळे आपणांस ठकवीत आहेत, असें मानितातसें दिसतें. त्याचे मुखांतून श्वासोच्छ्वासाशिवाय आश्चर्यानें शब्दही निघत नाहींत; परंतु कसेही तुम्ही भांबावलेले असला, तरी हें खरें माना कीं, मी प्रोस्पेरो आहें; ज्या सरदारास तुम्ही मिलन् शहरांतून हाकून लाविलें तोच हा मी. ज्या बेटावर तुमचें जहाज फुटलें

भोजनप्रसंगीं संपण्यासारिखी लहान नाहीं, व भेटतांच प्रथम ती सांगावी हेंही योग्य नाहीं. सांप्रत स्वागत असो, महाराज, आपणास; ही गुहा माझें राजमंदिर आहे; येथें थोडे बहुत सेवक आहेत, त्यांशिवाय इतर रयत म्हणून माझे राज्यांत नाहीं; कृपाकरून आंत डोकावा हींत. ज्या अर्थीं तुम्हीं माझें राज्य मला परत दिलें, त्या अर्थीं मीही कांहीं तुम्हांस तसाच उत्तम लाभ करून देतों.-निदान मला राज्यप्राप्तीपासून जो आनंद झाला तसाच कांहीं तुम्हांस आनंद होईल असा कांहीं चमत्कार तुम्हांस करून दाखवितों.

[गुहेचें दार आपोआप उघडतें व आंत फर्दिनान्द आणि मिरांदा अशीं उभयतां गंजिफा खेळत आहेत तें दिसतें.]

**मिरांदा**—प्रिया, तुझी गडे रडीचा खडी डाव खेळतां.

**फर्दिनान्द**—प्राणप्रिये, या सर्व जगाच्या प्राप्तीकरितां देखील कोणीं खोटें खेळ म्हटल्यास मी खोटें खेळणार नाहीं.

**मिरांदा**—होय तर, जगाची गोष्ट तर राहूंच द्या; पण खोटे खेळांत भांडून जर तुम्हांस वीसच गांव मिळतील, तर हवें असल्यास मी त्या खेळास मोठ्या सत्याचा खेळ म्हणेन.

**आलोंझो**—जर या बेटांतील ही कांहीं चेष्टाच म्हणून ठरेल, तर एका प्रियपुत्राच्या मरणाचें दुःख दुबार झाल्या-सारिखें होईल.

**सिबाश्चियन**—केवढा हा चमत्कार!





तूस फळून तुझें सर्वथैव संरक्षण करोत! तूं येथें पण कसा आलास तें आह्मांस सांग.

**मिरांदा**—वा! काय चमत्कार! किती तरी सुंदर प्राणी येथें आले आहेत हे! एकूण माणसें मोठीं सुंदरच असतात! ज्या नवीन जगामध्यें अशीं सुंदर मनुष्यें असतात तें जग-ही अति सुंदरच असेल.

**प्रोस्पेरो**—मुली, तें जग तुला मात्र नवें आहे.

**आलोंझो**—या मुलीबरोबर तूं खेळत होतास ही कोण! तुझी व तिची किती जरी ओळख असली, तरी ती तीन तासांहून जास्ती जुनी नसावी: आपणांस एकत्र जमविणारी व आपले प्राण वांचविणारी ही कोणी देवी तर नव्हे!

**फर्दिनान्द**—महाराज, ही मानुषी आहे; परंतु नित्य जो भगवान त्याचे कृपेनें ती माझी झाली आहे.—मला पित-रांची आज्ञा मागणें जेव्हां अशक्य होतें, व जेव्हां आपण गत झाल्याचीच मला शंका होती, त्या वेळेस मीं हिचें ग्रहण केलें. महाविख्यात जो मिलनचा ड्यूक, ज्याची कीर्ति मीं ऐकिली होती, परंतु ज्यास कधीं पाहिलें नव्हतें, त्याची ही कन्या आहे; त्यानें मला पुन्हां जीवदान दिलें. आणि या स्त्रीच्या संबंधानें ते आतां माझे दुसरे तीर्थरूप झाले आहेत.

**आलोंझो**—मीही तिचा तीर्थरूप झालों आहें आतां.

A4

B4

परंतु, अरे देवा! या मुलीचीच मला क्षमा मागितली पाहिजे; ही किती अपकीर्ति!

**प्रोस्पेरो**—महाराज, ही गोष्ट येथेंच पुरी करा. गत-दुःखाची आठवण करून वृथा दुःख कशास करावें.

**गोंझालो**—मीं एवढा वेळ रडें आवरून धरलें होतें, ना-हींतर मघांच बोललों असतों. हे भगवंता,[या जोड्यावर कृपादृष्टीनें तूं अवलोकन कर, आणि स्वर्गांहून यांचे मस्त-कावर मुकुट घाल. हे भगवंता, आह्मीं या बेटावर यावें ही करणी तुझेशिवाय दुसरें कोण करणार?]

**आलोंझो**—गोंझालो, मी तुझें बोलणें ऐकून तथास्तु म्हणतों.

**गोंझालो**—मिलनच्या मालकास तेथील गादीवरून जो उठविला तो त्याचे अपत्यानें नेपल्सच्या महासिंहासनावर ब-सावें ह्मणूनच काय! अहाहा! हा आनंद साधारण नव्हे! ए-काच सफरीमध्यें[क्ल्यारिबेलबाईसाहेबाचें ट्यूनिस येथें लग्न झालें, व त्यांचे बंधु फर्दिनान्द यांस, त्यांचाच थांग लागू नये अशा ठिकाणीं, उत्तम स्त्रीलाभ झाला. आणि एका भिकार बेटांत असतां प्रोस्पेरोस पुन्हां आपलें राज्य प्राप्त झालें; व जे आपण अनीश होतों तेच पुन्हां आपण आपलेसे झालों.] ही गोष्ट महाजयस्तंभावर सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवा.

**आलोंझो**—[फर्दिनान्द आणि मिरांदा यांस] मुलांनो द्या तुमचे हात इकडे: जो कोणी तुमचें अनिष्ट चिंतीत असेल त्यास सदैव दुःखवेदना होवोत.

**गोंझालो**—तथास्तु!

[एरियल येतो. आणि त्याचे मागून आश्चर्यानें चकित झालेले तांडेल व मोकद्दम येतात.]

अहो महाराज, इकडे बघा; हे आणिक कांहीं लोक आपणांपैकीं वांचलेले आले आहेत! मीं भविष्यच केलें होतें कीं, या मोकद्दमाचे कपाळीं फांसाशिवाय दुसरें मरण नाहीं ह्मणून हा कधीं बुडून मरावयाचा नाहीं.—कायरे अभद्या, जहाजावर कसें तोंड सोडिलें होतेंस; आणि आतां जमिनिवर कांहींच कां बोलत नाहींस? काय तुझें तोंड जमिनीवर आल्यावर बंद होतें? काय खबर आणिली आहेस?

**मोकद्दम**—पहिल्यानदां आनंदाची खबर ह्मटली ह्मणजे हीच आहे कीं आमचे महाराजसाहेब व आपण मंडळी सुखरूप आह्मांस सांपडलांत; आणि दुसरी आनंदाची खबर आमच्या जहाजाची आहे.—अहो तीन तासांपूर्वीं जें जहाज आह्मीं फुटून गेलें ह्मणून ह्मणत होतों, तेंच आतां सबंद असून सफर करण्यास योग्य आहे. शिडें, अवजारें, जशीं प्रथमतः दर्यांत लोटतेवेळेस नवीं करकरीत होतीं, तशींच आतांही आहेत!

**एरियल**—[प्रोस्पेरोच्या कानांत] महाराज हें सर्व कृत्य मीं आतांच जाऊन केलें.

**प्रोस्पेरो**—[एरियलच्या कानांत] शाबास खेळगड्या पिशाच्या, ठीक केलेंस.

**थालोंझो**—ह्या कृति अलौकिक दिसतात. ह्याचें नवल जास्त वाढतच चाललें आहे—पण तुम्ही येथें कसे आलांत तें सांगा.

**मोकद्दम**—महाराज, जर मला मी नीट भानावर आहे असें वाटेल, तर सांगण्याचा प्रयत्न तरी केला असता. परंतु महाराज, आम्ही सर्व,—कसे तें कोण जाणें,—अंबरांत मेल्याप्रमाणें स्वस्थ निजून राहिलों होतों. आणि नुकतेंच आरडा-

आरड, किंकाळ्या, बोंबाबोंब व बेड्यांची खणखण, आणि याप्रमाणेंच आणिक भयंकर नाद आम्हीं ऐकले आणि जागे झालों; आणि खुले होऊन पहातों तों आमचें लढाऊ व राजकीय जहाज पहिल्यावाणी नीटनेटकें व पहिल्यावाणीच सजिवलेलें आहे असें दिसलें; आणि आमचे तांडेल आनंदानें नाचूं लागले, इतक्यांत एकाएकीं जणु स्वप्नांतल्यावाणी मंडळीची आमचीं चुकामुक होऊन, वेड्याप्रमाणे आह्मी येथें आलों. महाराज आमच्या येण्याचा प्रकार हा असा आहे.

एरियल—[प्रोस्पेरोस] हें मीं नीट केलेंना?

प्रोस्पेरो—[एरियलास] हे बुद्धिमंता, हें तूं बहुत उत्तम केलेंस; आतां तुझी सुटका जलद होईल.

आलोंझो—मनुष्य कधीं अशा घोंटाळ्यांत सांपडला नसेल. आणि अशा गोष्टी स्वभावतः मागें कधींच घडून आल्या नसतील. हें सर्व अलौकिक दिसतें. कोण्या देवानेंच येऊन येथें उलगडा करून सांगितलें पाहिजे.

प्रोस्पेरो—महाराज, माझे धनी, या गोष्टीच्या चमत्काराचा मनांत घोष घेऊन बसूं नका. थोडक्याच वेळांत फुरसत पाहून या सर्व घडलेल्या गोष्टींची हकीकत सांगून मी तुमची खातरी करून देईन; तोंपर्यंत सर्व झालेलें नीटच झालें आहे असें समजून खुशाल राहा.—

[एरियलाच्या कानांत] अरे पिशाचा, असा इकडे ये ;—क्यालिबन आणि त्याचे सोबती यांजवरील मंत्र काढून त्यांची मुक्तता कर. [एरियल जातो]. कां, महाराज, आपलें कसें काय आहे? आपले मंडळींतील अझून कित्येक हरवलेले आहेत, ते गडी तर भले चमत्कारिक आहेत; परंतु त्यांची आपणांस आठवण नाहीं.

[एरियल क्यालिबन, स्तिफानो, त्रिक्युलो, यांस आंगावर चोरलेले कपडे घातलेले आहेत असे आंत हांकून घेऊन येतो.]

**स्तिफानो**—ज्यानें त्यानें आतां इतर सर्वांची काळजी दया घ्यावीरे बुवा. आप आपली काळजी आतां कोणी करूंनये. आतां सर्व नाश झाला; हे तर सर्व नशिबाचे खेळ आहेत; अरे राक्षसा लेका, आतां बघतोस काय?

**त्रिक्युलो**—जर हे माझे कपाळा जवळील डोळे मला चकवीत नसतील, तर वास्तविक येथें उत्कृष्ट मंडळी बसली आहेसे दिसतें.

**क्यालिबन**—अरे सितबोस देवा! किती तरी सुंदर हीं पिशाचें येथें बसलीं आहेत हीं! माझा धनी तर कसा सुंदर दिसत आहे! मला तो आतां चांगली शिक्षा करील ह्मणून पण भय वाटतें.

**सिबास्चियन**—हं हं? काय आन्तोनिओ महाराज, हे कोण चमत्कारिक तिकडून येत आहेत? या चिजा पैशानें विकत येतील काय?

**आन्तोनिओ**—याव्यात तर खचित. ह्यांतील एक तर शुद्ध मासाच आहे, आणि मला वाटतें त्यास बाजरांत खचित कोणी विकतही घेईल.

**प्रोस्पेरो**—महाराज, ह्यांचे आंगावरील कपडेच पहा; ह्यांवरूनच हे साव असावेत कीं नाहीं याची परीक्षा होईल.—हा कुरूप सोदा [ज्याची आई डांकीण होती, आणि जादूगिरी अशी जाणत होती कीं त्याचे योगें चंद्रावरही तिचा अम्मल चाले, आणि जी भरती व ओहटी आणून आपल्या शक्तीपलीकडे अघटित कृत्यें करी:]—या तिघांनीं मिळून माझे येथें

आह्मी पत्करितां.

**क्यालिबन**—आतां हा मला चिमटे घेघेऊन मारून टाकील.

**आलोंझो**—अहो, आमचा मद्यपी कोठारी स्तिफानो नव्हे काय हा!

**सिबाश्चियन**—आतां देखील दारूच्याच धुंदींत आहे तो; पण या बेट्यास दारू तरी कोठें मिळाली असेल?

**आलोंझो**—आणि हे त्रिंक्युलोबुवाही पण दारूंत बुडून कसे लाल झाले आहेत. यास सर्व लाल करून टाकण्यासारिखी ही बया कोठून सांपडली असावी!—अरे, पण तुझी गुडाखूर कशानें अशी झाली आहे?

**त्रिंक्युलो**—महाराज, आपली चुकामूक झाल्यापासून माझी अशी कांहीं गुडाखू झाली आहे कीं, माझीं हाडें आतां जन्मभर नीट होणार नाहींत असें वाटतें. आतां मी संधिवातास भिणार नाहीं.

**सिबाश्चियन**—कां, स्तिफानो, कसें काय आहे?

**स्तिफानो**—अरे बुवा, माझे आंगास नको हात लावूं; कसचा स्तिफानो आणि कसचा काय. येथें झालें आहे सर्व आंगाचें थिरडें.

**प्रॉस्पेरो**—कायरे मादरचोदा, या बेटाचा राजा होणार होतास ना तूं?

**स्तिफानो**—राजा झालोंच असतों तर लुला राजा झालों असतों.





**आलोंझो**—(क्यालिबनाकडे बोट दाखवुन) परंतु असें चमत्कारिक तर आजपर्यंत कांहीं पाहण्यांत आलें नव्हतें.

**प्रोस्पेरो**—हे असे बाहेरून विद्रूप आहेत तश्याच सर्व यांच्या कृतिही विद्रूपच आहेत.—मादरचोदा, जा आमच्या गुहेंत आणि आपले सोबतीही आपल्या बरोबर घेऊन जा. जर कांहीं क्षमेची इच्छा असली तर सर्व नीटनेटकें करून ठेव.

**क्यालिबन**—होय ठेवतों; आणि आजपासून शहाणपणानें वागून आपली मर्जी संपादीन. या छाकट्याला आणि मूर्खाला मी देव म्हणून मानीत होतों. काय तरी वेडा मी!

**प्रोस्पेरो**—जा येथून चालता हो.

**आलोंझो**—जा येथून आणि जेथें तुम्हांस हें सटरफटर सांपडलें तेथेंच नेऊन ठेवा.

**सिबाश्चियन**—जेथें सापडलें कां म्हणतां, चोरून घेतलें असें कां नाहीं म्हणत!

[क्यालिबन, स्तिफानो आणि त्रिंक्युलो जातात.]

**प्रोस्पेरो**—आपणांस व आपल्या बरोबरचे मंडळीस, आज माझ्या या पर्णकुटींत राहून आजची रात्र विसावा घ्यावा, ह्मणून मी आमंत्रण करितों. रात्रीं मी कर्मणूक होऊन रात्र केव्हांच सरून जाईल असल्या कांहीं गप्पा गोष्टी सांगेन. या बेटांत आल्यापासून कसकसे प्रसंग आले वगैरे सर्व वृत्तांत सांगेन. पहाट झाल्यावर मग तुमच्या जहाजाकडे तुह्मांस घेऊन जाईन. आणि मग तेथूनच आपण नेपल्स शहरास कूच करूं. तेथें यांचा लग्नसमारंभ पहाण्याची मोठी इच्छा आहे. या बाळांचा लग्नाचा सोहळा झाल्यावर मी मिलनमध्यें जाऊन अंतकाळाची वाट पहात बसेन.

**आलोंझो**—मला तुमचा वृत्तांत ऐकण्याची मोठी उत्सु-

कता प्राप्त झाली आहे; कारण तो निःसंशय अति मनोवेधक असायाचाच.

**प्रोस्पेरो**—सध्यां इतकेंच सांगतों कीं:—

॥ श्लोक ॥

॥ होतील वायु अनुकूल सुगम्य मार्ग ॥
॥ लागेल जाण अतिशांत समुद्र सर्व ॥
॥ साधेल कीं गमन सत्वर इतुकें तें ॥
॥ गाठूं क्षणें प्रथम तारुं दुरावलें जें ॥

[एकीकडे एरियलाचे कानांत] ऐकलेंस ना रे गड्या, आतां एवढी कामगिरी बजाव म्हणजे झालें. मग तूं खुशाल हवेंत मिसळून मजा मार. [सर्वांना] चला महाराज सर्व.

सर्व जातात.

अंक ५ वा समाप्त.

**समाप्त.**

# शिष्टप्रार्थना.

## अभंग.

॥ मंत्रशक्ति माझी सर्व लया गेली ॥
॥ शेष कीं राहिली स्वाभाविक ॥ १ ॥
॥ बापुडा मी नेल्या पाहिन नेपल्स ॥
॥ येथें ठेवल्यास मर्जी तुमची ॥ २ ॥
॥ परि नसुनीयां प्रार्थीतों तुम्हांला ॥
॥ सोडूनीयां मला जाऊं नका ॥ ३ ॥
॥ माझें राज्य मातें ज्या अर्थी मिळालें ॥
॥ तैसेंची क्षमीलें वंचकांसीं ॥ ४ ॥
॥ मंत्राच्या सामर्थ्यें बांधोनी निश्चीत ॥
॥ निर्जन बेटांत सोडूं नका ॥ ५ ॥
॥ परि कृपा करा जोडा दया माया ॥
॥ पाश तोडोनीयां टाका माझे ॥ ६ ॥
॥ सिद्धीतें नेण्यास हेतू जो इच्छीत ॥
॥ पिशाचें नाहींत सन्नीकट ॥ ७ ॥
॥ मंत्र तंत्र विद्या सर्व कीं त्यागीली ॥
॥ निराशा राहिली आधारची ॥ ८ ॥
॥ परि कीर्त्तनाचा घोष भावें केल्या ॥
॥ येईं देवराया दया साची ॥ ९ ॥
॥ भरवाल जरी कीर्त्तनाचा रंग ॥
॥ होई पापभंग निश्चयेंची ॥ १० ॥
॥ काय सांगूं तुम्हां कीर्त्तनमहिमा ॥
॥ अगाध तो आम्हा वर्णवेना ॥ ११ ॥
॥ ईश्वर कीर्त्तनीं लय जे लावीती ॥
॥ त्यांचीं सर्व जाती पापें लया ॥ १२ ॥

## ॥ आर्या ॥

॥ अपुल्या अपराधांचें
मोचन व्हावेंचि जैवि मनिं इच्छा ॥
॥ तव्याया लक्षोनी
तुम्ही मम मुक्ति तैंवि मनिं इच्छा ॥ १३ ॥
[जातो.]

**समाप्त.**